श्रीराम

# राजाचें बंड!

अर्थात्

## एक मनोराज्य !

कार्यं सोऽवेक्ष्य शक्तिं चं देशकालौ च तत्त्वतः ।
कुरुते धर्मसिद्ध्यर्थं विश्वरूपं पुनः पुनः ॥

—म. स्मृ., अध्याय ७—श्लोक १०

हें नाटक

**त्र्यंबक सीताराम कारखानीस**

( संस्थापक व आद्य चालक महाराष्ट्र नाटक मंडळी )

यांनीं रचिलें.



आवृत्ति पहिली

शके १८४६ ]  [ सन १९२४

किंमत १ रुपया

## याच कर्त्याचीं इतर पुस्तकें.

प्रत्येकीं किं. ४ आणे

दिवाळीची भेट (दोन गोष्टी).

मैनाताईचा हलवा (एक गोष्ट).

वेणीसंहार (प्रयोगदृष्ट्या चर्चा).

अनंत सखाराम गोखले, यांनीं पुणें, शनिवार पेठ,
घ. नं. ५७० येथें 'विजय' छापखान्यांत छापिलें;
व त्र्यंबक सीताराम कारखानीस, यांनीं पुणें,
शनिवार पेठ, घ. नं. २८१ येथें
प्रकाशित केलें.

श्रीराम

# प्रस्तावना

सहृदय प्रेक्षक व वाचक यांच्यापुढें मांडलेली ही नाट्यकृति केवळ एक मनोराज्य आहे. तरीपण तें अगदींच एखाद्या शेखमहंमदाचें नव्हे. जगांत अस्मानी-सुलतानीचे केव्हां केव्हां असे कांहीं प्रसंग घडतात, कीं त्यांनीं मन घेरल्यासारखें होऊन त्या अवस्थेंत 'जग असें असें असतें तर!' असें 'मनोराज्य' कोणाही मननशील मनुष्याच्या मनांत सुरू झाल्यावांचून रहात नाहीं. तशाच एका अवस्थेंतील हें मनोराज्य यथामति दृश्य स्वरूपांत लोकांपुढें मांडण्याचा हा यत्न आहे. अर्थात् केवळ एकाच व्यक्तीचें हें मनोराज्य ठरलें, तर तें निरर्थक होय. विचारानें पटलें व कलेनें रुचलें, तरच तें शेखमहंमदी ठरणार नाहीं. विचारवंत रसिक याचा निर्णय करतीलच.

या नाटकांतील 'वर्तमान' मनोराज्यांतील असल्यामुळें यांतील 'देश' व 'काल' हींही मनोराज्यांतीलच मानलेलीं आहेत. मनोराज्याचा भास उत्पन्न करावा, यासाठींच मुद्दाम देशाचीं व व्यक्तींचीं निरनिराळ्या काळचीं नांवें व त्यांचे निरनिराळ्या काळचे विचार हे एकत्र एकाच भूमिकेवर योजलेले आहेत. आकाशांत निरनिराळ्या अंतरांवर असणारे ग्रह व तारे एकाच छताला लटकलेले दिसतात, तसाच भास उत्पन्न करण्याचा हा प्रयत्न आहे. तो पटला नाहीं तर 'कवि' नसतांना कवींचा देश-काल विपर्यास करण्याचा निरंकुशपणा मात्र मीं उचलला, असें होणार आहे. आणि मग मात्र तो विपर्यासाचा दोष मला पदरीं घ्यावाच लागेल.

'महाराष्ट्र नाटक मंडळी' या संस्थेमुळेंच केवळ ही कृति नाट्यरूपानें बाहेर आली आहे. तेव्हां त्या संस्थेचे प्रथम मला आभार मानले पाहिजेत. सदर संस्थेशीं माझें नातें लक्षांत घेतां हे आभार मानणें चमत्कारिक दिसेल; पण सदर संस्थेचा मी निमित्तमात्र संस्थापक असून वस्तुतः आतां ती संस्था सबंध महाराष्ट्राची झालेली आहे. तिच्यामुळें आजवर महाराष्ट्रांत किती प्रतिभाशाली नवीन नाटककार निर्माण झाले व महाराष्ट्र-वाङ्मयांत तिच्यामुळें किती नाटक-ग्रंथांची भर पडली, हें मनांत आणलें, म्हणजे तिच्याबद्दल कोणालाही कौतुक व कृतज्ञता वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

सदर संस्थेचे हल्लींचे चालक रा० **दत्तोबा देशपांडे** व **केशवराव दाते** यांची फारा दिवसांपासूनची मनापासून इच्छा, कीं मीं मंडळीकरितां नाटक लिहावें. त्याप्रमाणें तें लिहीत असतां त्यांनीं वारंवार जें प्रोत्साहन दिलें व लिहून झाल्यावर परिश्रमपूर्वक बसवून उत्तम सजावटीनें रंगभूमी-वर आणण्याचे कामीं जी कळकळ दाखविली, त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. त्याचप्रमाणें मंडळींतील सर्व बाल-तरुण नटांनीं व एकंदर मंडळींनीं माझ्या नाटकाविषयीं जिव्हाळा बाळगून उत्साहपूर्वक प्रेमानें आपापलीं कामें केलीं, याबद्दल त्यांचाही मी ऋणी आहें. अर्थात् त्यांनीं प्रस्तुत नाटकांत घालण्यासाठीं आपले निरनिराळ्या प्रसंगांचे फोटो दिले, याबद्दल निराळे आभार मानले पाहिजेत असें नाहीं.

गेल्या वर्षभर बहुतेक आजारी स्थितींत असतांनाच मला हें नाटक लिहावें लागलें. अशा स्थितींत माझ्या नाटकाबद्दल नेहमीं प्रेमळपणाच्या जिव्हाळ्यानें चर्चा करून माझा धीर खचूं न देतां मला ज्यांनीं ज्यांनीं प्रोत्साहन दिलें व मार्मिक सूचना केल्या, त्यांत रा० **केशवराव दाते** व रा० **शंकरराव गर्गे** (नाट्य-छटाकार) यांचा मला प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे.

सदर नाटकाच्या छपाईचें सुबक काम करणारे 'विजय' प्रेसचे मालक रा० **आप्पासाहेब गोखले** व रंगभूमीवरील देखावे रंगवून नाटकाची सजावट करणारे प्रसिद्ध रंग-चित्रकार हैदराबादचे रा० **पु. श्री. काळे** या उभयतांनीं केवळ धंद्याचे दृष्टीनेंच नव्हे तर स्नेहाच्या आपलेपणानें जें काम केलें त्याबद्दल त्या उभयतांचाही मी आभारी आहें.

याशिवाय कांहीं गुरुजन व जन्माचीं जिव्हाळ्याचीं माणसें व सोबती यांचे आशीर्वाद आणि प्रेम यांची जोड न मिळती तर मजकडून कांहींच झालें नसतें. अशांचा आभारपूर्वक नामनिर्देश करून मोकळें होणें मला श्रेयस्कर नाहीं. अशांची जोड जन्मोजन्मीं लाभावी म्हणून त्यांच्या ऋणांतच राहणें बरें वाटतें.

पुणें, २८१ शनिवार पेठ,
मार्गशीर्ष शुद्ध १४ दत्तजयंति १८४६
ता. १० डिसेंबर सन १९२४.

**त्र्यं. सी. कारखानीस.**

॥ श्रीराम ॥

# राजाचें बंड !

## अर्थात्

## एक मनोराज्य !

## अंक १ ला.

### प्रवेश पहिला.

[ भारतवर्षाच्या सीमान्त प्रदेशांतील एक ग्राम. ग्रामवासी आबालवृद्ध एका देवालयांत करुणागीतें म्हणत भजन करीत आहेत. ]

**गीत**

[ चाल—'येऊं दे वाचे नाम देवाचें०'—अनतफंदी ]

देवा धांवाजी, ब्रीद राखाजी ॥

संकटहरणा करुणाकर हर । देवा धांवाजी ब्रीद० ॥ धृ० ॥

धांवा करि प्रल्हाद, ऐकली साद, दवडिली दूर रमा ।

भक्तकाजकैवारि तुम्हां ।

सुखशय्येची नाहिं तमा ।

दीनाची करुणा परमा ।

भक्त बाळ ना त्या उपमा ।

नामाचा मांडी महिमा ।

स्तंभीं जाउनि त्याच्यासाठीं लत्ता घेतां, कडकड कडकड ॥ देवा० ॥ १ ॥

सभेंत मारी हांक द्रौपदी, बहिण अशी कां दिलि लोटून।
म्हणे कृष्णजी आक्रंदून।
अनाथनाथा अरिभंजन।
गाय गांजिती खलदुर्जन।
लाज तुम्हां व्रजवासि निरंजन।
करुणावाणी अशि ऐकून।
वस्त्रांमागें वस्त्र होऊनी दुःशासन शासिलात झडकर ॥ देवा० ॥ २ ॥

भक्तवत्सला, दीनोद्धरणा धांव पाव हें संकट हारी ॥
मिराबाइचा तूं गिरिधारी।
गजेंद्रहांकेचा कैवारी।
दामाजीचा मिरासदारी।
संतसखूची करिसी वारी।
उभा संकटीं सदा मुरारी।
ब्रीद तुझें हें हांक फोडुनी सदा गात श्रीरामकिंकर ॥ देवा० ॥ ३ ॥

[धांवा सपतांच विचित्र वेषधारी एक व्यक्ति येते.]

व्यक्तिः—हा भक्तीच्या प्रेमाचा सूर ऐकून भाविकांच्या भजनाची भीक मिळण्यासाठीं विदूषक रूपानं भटकणारा हा एक भणंग देवाच्या द्वारीं आला आहे.

प्रमुख ग्रामवासीः—देवाच्या द्वारीं भजनाचं भांडार कुणालाही खुलं आहे. तिथं कुणी कुणाला भणंग म्हणावं ? यावं महाराज.

[पुन्हा भजन]

अभंग

भाविकांचें काज अंगें देव करी। काढी धर्मा घरीं उच्छिष्ट तें ॥
उच्छिष्ट तीं फळें खाया भिल्लणीचीं। आवडी तयाची मोठी देवा ॥
काय देवा घरीं न मिळेचि अन्न। मागें भाजीपान द्रौपदीशीं ॥

अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें। संकटें बहूतें निवारीलीं ॥
तुका म्हणे ऐसीं आवडतीं लडिवाळें। जाणिवेचें काळें तोंड देवा ॥

**व्यक्तिः**—आपला हा भजनाचा नित्यपाठ आहे काय ?

**ग्रामवासीः**—नाहीं महाराज, आम्हां संसारी लोकांचं तितकं भाग्य कुठं आहे? कधीं संकटकाळीं त्याची आठवण होते, तेव्हां हा असा वेडावांकडा धांवा करीत असायचं.

**व्यक्तिः**—सांप्रत आपल्यावर कांहीं संकट आहे कीं काय ?

**ग्रामवासीः**—आमच्यावरच काय, पण या भागांतील सर्व लोक सांप्रत एका घोर चिंतेंत आहेत. स्वामी विश्वानंदजी कुणाला माहीत नाहीत? त्यांची कन्या म्हणजे आम्हां सर्वांच्या माईजी. स्वामीजी गेल्या युद्धाच्या सुरवातीलाच अदृश्य झाले. युद्धकाळीं माईनीं आम्हां घायाळ लोकांसाठीं संजीवनालयं काढून आमची अहोरात्र शुश्रुषा केली. आणि आतां त्या स्वतांच भयंकर दुखण्यानं रोगशय्येवर पडून आहेत. त्यांना आराम पडावा म्हणून गांवोगांवच्या लोकांनीं देवाची करुणा भाकण्यासाठीं हे धांवे चालविले आहेत.

**व्यक्तिः**—'भाविकांचें काज अंगें देव करी' हेंच खरं! तुमच्या माईजींना देवानं आराम दिला आहे बरं.

**सर्वः**—देव तुमचं कोटकल्याण करो!

**एक ग्रामवासीः**—महाराज, आपण कोण? आणि हा विचित्र वेष—

**व्यक्तिः**—स्वामीमहाराजांचाच एक गरीब शिष्य आहे मी. मला आनंदा म्हणतात.

**ग्रामवासीः**—काय आपणच आनंदा ?

**व्यक्तिः**—होय, तोच मी. स्वामीजी अदृश्य झाल्यापासून या अशा वेषांत असतो कुठंतरी.

**ग्रामवासीः**—चाललंच आहे! पांडवासारख्यांनाही अज्ञातवास काढावा लागला! पण महाराज, माईजींना खरंच आराम पडला आहे ?

**आनंदाः**—खरंच? पहा! देव स्वतांच तुमच्यासारख्या भाविकांच्या अंतर्यामीं येऊन तुम्हाला साक्षात्कार देईल. क्षणभर डोळे मिटून याच भक्तिभावानं त्याचं ध्यान करा पाहूं.

[सर्वजण डोळे मिटून ध्यान करतात. आनंदा निर्धाराच्या वाणीनें त्यांना जी जी सूचना देतो तसतसा देखावा त्यांना अंतर्यामीं दिसतो.]

**आनंदाः**—पहा ! देवी वत्सलामाईच्या संजीवनालयांतील त्यांचं तें निवासस्थान पहा ! ती त्यांची शय्या ! प्रभु रामचंद्राच्या तसबिरीसमोर हात जोडून त्या ध्यानस्थ बसल्या आहेत. पहा !

[इतकें म्हणून झटकन् निघून जातो.

**सर्वः**—धन्य, धन्य देवा ! आम्हां भोळ्याभावड्या भक्तांची करुणा तूं ऐकलीस. अरे पण, आनंदा कुठं आहे ? आनंदा कुठं आहे ? आनंदा कुठं आहे ?

**एक ग्रामवासीः**—'भाविकांचें काज अंगें देव करी' ! देवा, तूंच कारे हा साक्षात्कार द्यायला आला होतास ?

**सर्वः**—देव आनंदाच्या रूपानं आला ! देवच आनंदाच्या रूपानं आला ! देवच आनंदाच्या रूपानं आला ! चला, या आनंदाचा आपण आनंदोत्सव करूं !

[जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[**स्थळ**—भारतवर्षाच्या सीमान्त प्रदेशांतील एका संजीवनालयाचा बाह्य प्रवेश. पात्रेः—**कमलादेवी** व **काकाजी.**]

**कमलाः**—काकाजी, इथं माझ्यामागं या संजीवनालयांत सुद्धां अमात्यांचे हेर आहेत म्हणतां ?

**काकाजीः**—होय, म्हणून तर ताईसाहेब, आपणाला मी मुद्दाम मोकळ्यावर बागेत घेऊन आलों. कारण भिंतींना कान असतात !

**कमलाः**—मग उद्यांच्या दरबारचं माझ्या नांवाचं हें आज्ञापत्र अमात्यांनीं माझ्या संस्थानाकडेसं पाठवलं ?

**काकाजीः**—ताईसाहेब, अमात्य मोठे धोरणी मुत्सद्दी आहेत. आपण इथं छद्मवेषानं असतांना आपलं आज्ञापत्र इकडं पाठवणं त्यांना सोईचं नाहीं.

**कमलाः**—आणि माझ्या मागं हेर ठेवणं मात्र सोईचं आहे ! मला मोठं नवल वाटतं, कीं माझ्या मागं देखील त्यांचे गुप्त हेर !

**काकाजीः**—कां बरं ? आपण राजभगिनी कमलादेवी आहांत म्हणून होय ? मुत्सद्यांचे हेर खुद्द राजांच्यामागं देखील असतात ! शिवाय ताईसाहेब, आपण आपल्या विवाहासंबंधाच्या अमात्यांच्या धोरणाला विरोध केलेला आहे, हें विसरतां. सेनापति उग्रसेन यांच्यासाठीं दरबारनं आपणाला घातलेली मागणी आपणाला रुचली नाहीं. आणि आपण एकदम स्वतांच्या संस्थानांत निघून गेलांत.

**कमलाः**—पण तिथं जाऊन मी कांहीं राजकारण करीत बसलें नाहीं. इथं माईच्या या संजीवनालयांत येऊन तिच्या भूतदयेच्या कार्याला हातभार लावण्यासाठीं एक निरुपद्रवी परिचारिका बनलें आहे.

**काकाजीः**—ताईसाहेब, एक वेळ आपण आपल्या संस्थानांतच राहता, तर पुरवतं. पण हीं संजीवनालयं युद्धकालीं आणि नंतरही राष्ट्राला उपकारी झालेलीं असलीं, तरी अमात्यप्रभृति सरदारमंडळाचा या संजीवनालयांवर रोषच आहे.

**कमलाः**—कां बरं ?

**काकाजीः**—कारण हीं देवी वत्सलामाईनीं स्थापन केलेलीं आहेत ! आणि देवी वत्सलामाई म्हणजे सरदारमंडळाला अप्रिय असलेले स्वामी विश्वानंदजी यांची कन्या ! आणि दीनदासजी यांची भगिनी !

**कमलाः**—राष्ट्राला उपकारी झालेल्या निरुपद्रवी गोष्टींचा देखील सरदारमंडळाला हेवा वाटावा ?

**काकाजीः**—विश्वबंधुत्वाच्या प्रेमांत सर्वांनीं गुण्यागोविंदानं रहावं, असं ताईसाहेब, आपणासारख्यांना स्वामिजींच्या प्रसादानं वाटत असलं, तरी सर्वसामान्य मानवी मनाची प्रवृत्ति तशी कुठं आहे ? सत्तास्वरूपी परमेश्वराचं पद आपल्याला असावं, हीच ज्याची त्याची हांव ! त्यामुळं दुसऱ्याच्या यत्किंचित् सत्तेचाही मनुष्याला मोठा हेवा वाटतो.

**कमलाः**—पण माईला बिचारीला सत्तेचा काडीचा तरी लोभ आहे कां ?

**काकाजीः**—माईना लोभ नाहीं; पण सत्ता मात्र त्यांच्या चरणांशीं लोटांगणं घालीत आली आहे ! त्या आजारी पडल्या तेव्हां लोकांनीं ठिकठिकाणीं त्यांच्यासाठीं देवाचे धांवे आरंभले होते ! आणि आतां त्यांना

आराम पडल्याचं ऐकून आनंदोत्सव चालविले आहेत! लोकांच्या अंतःकरणावरची ही सत्ता—

**कमला**:—ही प्रेमाची सत्ता! असल्या सत्तेचा राजाच्या राणीलाही हेवा वाटेल!

**काकाजी**:—आणि जुलमाची सत्ता हिच्यापुढं फिकी पडते म्हणूनच सरदारमंडळाला हिचा हेवा वाटतो.

**कमला**:—या सरदार मंडळाचा हा सत्तेचा लोभ अनावर झाला असून, त्यामुळं प्रजाही बरीच त्रस्त झाल्यासारखी दिसते, नाहीं? सैनिकवर्ग, हा साहजिक सत्तेवर लुब्ध असायचा; पण युद्धकालीं या संजीवनालयांत आलेले बरेच सैनिक नाखूप दिसले! आणि माईचे बंधु दीनदासजी तर सरदारमंडळावर नुसते जळफळत असत.

**काकाजी**:—इतकंच काय, पण आतां त्यांनीं सरदारमंडळाशीं उघड उघड विरोध आरंभला आहे!

**कमला**:—माझ्या कुमार दादाला जर या गोष्टी कळल्या—

**काकाजी**:—ताईसाहेब, आपण आणि महाराज कुमारसिंह या उभयतांनाही या वृद्ध मालदेवानं कडेखांद्यावर घेऊन वाढवलं आहे. महाराज किती कोवळ्या आणि हळव्या मनाचे आहेत, ते या वृद्ध सेवकाला पूर्ण माहिती आहे. पण त्यांना हें अपार वैभवशाली सम्राट्पद ऐन तारुण्यांत मिळालं. आणि सरदारमंडळानं त्यांना नुसतं तारुण्याच्या सुखविलासांत गुंग करून ठेवलं आहे.

**कमला**:—असं झालं आहे खरं. त्यामुळं प्रजेची तर काय, पण बाळपणापासून अत्यंत लाडकी असलेल्या या कमलची देखील त्यांना अलीकडे आठवणमुद्धां होत नाहीं.

**काकाजी**:—पण यांत कुमाराकडं अगदीं दोष नाहीं बरं. महाराजांचा खुषमस्कऱ्या आनंदा म्हणत असतो, कीं राजा म्हणजे एक अलौकिक बंदिवान! इतरांच्या देहालाच काय तो बंदिवास, पण याच्या मनालासुद्धां स्वतंत्रपणें विचार करण्याची मोकळीक नाहीं! कारण कोणत्याही विचारासाठीं मनाशीं मंत्री हा उभाच! कोणताही राजसेवक, हा या बंदिवानाचा पहारेकरी आहे. आहार-विहार, फार काय, पण निद्रासुद्धां या बंदिवानाला

स्वतंत्रपणें घेतां येत नाहीं ! कारण पलंगचौकडीचे पहारेकरी आहेतच ! मंत्री, सेवक आणि विलास यांच्या गराड्यांत सांपडलेला हा बंदिवान, याला प्रजेकडं काय किंवा आपणाकडं काय, पहायला मोकळीक आणि फुरसत असेल तरी कशी ?

**कमला:**—आणि त्यामुळंच सरदारमंडळ प्रबल झालं आहे, नाहीं ?

**काकाजी:**—प्रबळच काय, केवळ मदांध आणि अनन्वित जुलमी बनलं आहे. एकेका सरदाराच्या जुलमाचे आणि बलात्काराचे जे कल्पनातीत प्रकार कानीं येतात—

[ इतक्यांत पडद्यांत पुढील आर्तस्वरयुक्त करुणालाप ऐकूं येतो.

**वीर–न–वाली ! वीर–न–वाली !**
**कां हो या ना, वीर–न वाली ?**

**काकाजी:**—ऐका ताईसाहेब, ही बोलाफुलालाच गांठ !

[ पुन्हां पडद्यांत—

**कलिजा माझा वीर–न–वाली !**
**कोठें गेला वीर–न–वाली ?**

**कमला:**—( स्तब्धतेनंतर किंचित् वेळानें ) वीरनवाली ! वीरनवाली ! भारतवर्षाच्या दुर्दैवी स्त्रिये ! तुझी करुणकहाणी आठवली, कीं आंतड्याला पीळ पडतोग ! आणि सारं रक्त कसं उसळून येतं. आमच्या सर्वस्वाचं रक्षण करणारे आमचे सेनापति ! त्यांनींच आपल्या हाताखालील एका इमानी वीराच्या स्त्रीची ही कोण अवस्था करून टाकली आहे ! हीच काय, अशा कैक दुर्दैवी अबला—अमात्य ! असल्या नराधमाची मी सहचारिणी व्हावं काय ?—काकाजी, या माळाच्या बाजूनंच तिचा आवाज आला नाहीं ? चांदण्याचा प्रकाश आहे, दिसेल का ती ?

**काकाजी:**—ताईसाहेब, तिच्यामागं जाणं व्यर्थ आहे. ती कधीं कुणाच्या हातींच लागत नाहीं. सेनापतींनीं कपटानं तिच्या नवऱ्याला मारून त्याचं प्रेत कालियाडोहांत टाकलं; त्याबरोबर तिनंही त्याच डोहांत उडी घेतली. भाई दीनदासजीनीं त्यावेळीं तिला बाहेर काढली. पण तेव्हांपासून तिची ही अशी अवस्था होऊन, अशीच कुठंतरी रानावनांत ती

वेड्यासारखी भटकत असते. मनुष्याच्या धाऱ्यालाही ती उभी रहात नाहीं. केव्हां केव्हां रात्रीच्या वेळीं, आतांच्यासारख्या एखाद्या नेमक्या प्रसंगीं मात्र, अचूकपणें हा असा तिचा वेडाच्या लहरींतला आलाप तेवढा ऐकूं येत असतो. [ पुन्हां पडद्यांत—

का हो याना, वीर--न—वाली ?

वीर—नू--वाली ! वीर-न-वाली !

**कमलाः**—तिच्या दुःखाच्या वेडाची ही लहर अलीकडं जरा शांत झाल्यासारखी वाटत होती.

**काकाजीः**—या भागाला अलीकडं तिचा संचार झाला नसेल, म्हणून आपला तसा समज झाला असावा. पण उद्यांच्या दरबारच्या महोत्सवासाठीं विजयस्तंभ उभारला आहे, तो सीमान्तप्रदेशाचा सगळा भाग तिच्या या करुणालापांनीं अलीकडं जसा कांहीं दुमदुमून गेला आहे.

**कमलाः**—माईचं हृदय तिच्यासाठीं किती तिळतीळ तुटतं म्हणून सांगूं. क्षीणतेमुळं माई अजून पडून आहेत, नाहींतर एव्हांना धांवतच आल्या असत्या. तिला शोधून आणून आपणाजवळ या संजीवनालयांत ठेवावी, म्हणून तिच्यामागं माईनीं अनेक वेळां माणसं पाठविलीं.

[ इतक्यांत पडद्यांत—

*त्रिखंड हिंडे वीरनवाली*

जनांत एकलि वीरनवाली

वनांत एकलि वीरनवाली

कां हो याना, वीर—न्—वाली ?

**वीरनवालीः**—( प्रवेश करून ) **नाहीं ना, मज कोणिच वाली ?**

[ **कमलादेवी** आणि **काकाजी** तिजकडे जातात. ती तारस्वरानें 'वीर—न्—वाली ! वीर—न्—वाली !' असें म्हणत झट्‌कन्‌ नाहींशी होते.]

**काकाजीः**— गेली—पार नाहींशी झाली ! अशी ओझरती कधीं एखादे वेळेला दृष्टीस पडते न पडते, तोंच अदृश्य होते !

**कमलाः**—तिचं हें दर्शन आणि तो आलाप ! पापी हृदयांचा तर थरकांपच होईल; पण परमेश्वराला स्मरून स्वधर्माचरण करणाऱ्या सज्जनांना देखील

हा आलाप ऐकून आपलं कुठंतरी चुकतं आहे, असं वाटल्यावांचून राहाणार नाहीं.

**काकाजीः**—ताईसाहेब, एवढं मात्र खास, कीं तिच्या मुखानं या भारतवर्षाची भूमाताच हा करुणेचा हंबरडा फोडीत आहे.

**कमलाः**—हे ऐकून मन अगदीं चर्र होऊन जातं !

**काकाजीः**—विशेषतः नेमक्या ठिकाणीं, नेमक्यावेळीं हा करुणालाप अलीकडं अचूक ऐकूं येतो. त्यामुळं तर खंबीर मनाला देखील धसका बसल्यासारखा होतो.

**कमलाः**—विजयस्तंभाच्या भागालाच अलीकडं हिचा संचार फार होतो म्हणतां ?

**काकाजीः**—होय, आणि त्यामुळं उद्यांच्या शांततेच्या दरबारचीं चिन्हं मला कांहीं बरीं दिसत नाहींत.

**कमलाः**—केवळ या वीरनबालीच्या संचारामुळं आपणाला इतकी काळजी वाटते ?

**काकाजीः**—त्यानं तर मन अधू होतंच; पण प्रत्यक्षही कांहीं चिन्हं दिसून येत आहेत. ताईसाहेब, गेल्या युद्धाच्यावेळीं भाई दीनदासजींनी कांहीं सैनिकांचीं पथकं उभारलीं होतीं, हें आपणाला ठाऊक आहेच ?

**कमलाः**—हो ! तें कोणाला ठाऊक नाहीं ? त्या पथकांनीं तर युद्धाच्या ऐन आणीबाणीच्या वेळीं भारतवर्षाची बाजू सांवरून धरली.

**काकाजीः**—तीं पथकं, या संजीवनालयाप्रमाणंच सरदारमंडळाला आतां खपेनाशीं झालीं आहेत. आणि शांतता प्रस्थापित झाल्याचं निमित्त करून त्यांना निःशस्त्र करण्याचा सरदारमंडळाचा घाट आहे. खुद्द सेनापतींनीं एका प्रसंगीं ही गोष्ट उघड बोलून दाखविली. अर्थातच, हें ऐकून दीनदासजी आणि त्यांचे लोक फार प्रक्षुब्ध झाले आहेत. त्या सर्व लोकांना उद्यां विजयस्तंभापाशीं गोळा होण्याबद्दल दीनदासजींचे आदेश सुटले असून, उद्यांच्या प्रसंगीं खुद्द महाराजांजवळ या गोष्टीची दाद मागण्याचा त्यांचा विचार दिसतो.

**कमलाः**—माझा कुमार दादा याची दाद घेईल इतकंच नव्हे, तर असल्या वीरांचा तो गौरवच करील !

**काकाजीः**—पण ताईसाहेब, उद्यांच्या प्रसंगीं सरदारमंडळ आणि त्यांच्याच मदांधतेनं प्रक्षुब्ध झालेले लोक यांचा समोरासमोर एकत्र योग येणार आहे ! त्यांतच मस्तक भणाणून सोडणारा हा वीरनवालीचा आक्रोश ! भाई दीनदासजी, पाणी समजून हें ज्वालाग्राही तेलच अग्नीच्या सन्निध नेत नाहींत काय ?

**कमलाः**—अगबाई, खरंच ! हा नव्हता मीं विचार केला. खरंच, दीनदासजी हें अगदीं भलतंच करीत आहेत. छेः, यावेळीं या प्रक्षुब्ध लोकांना त्यांनीं तिकडं नेऊंच नये. दीनदासजींना या वेळीं कोणी परावृत्त करील का ? काय करावं ? माई बरी असती--पण त्याहून स्वामीजी या वेळीं असते-खरंच, काकाजी, स्वामीजींची आठवण किती तरी वेळां येते. एके काळीं माई अत्यवस्थ होऊन 'बाप्पाजी ! बाप्पाजी !' असा त्यांच्या नांवाचा त्यांनीं ध्यास घेतला होता, तेव्हां तरी ते येतील असं फार वाटत होतं. युद्धाच्या सुरवातीला, हें युद्ध टाळण्याविषयीं सेनापतिप्रभृति सर्वांची विनवणी करून, अखेरीस महाराजांची भेट घेण्यासाठीं म्हणून जे ते गेले, ते तेव्हांपासून अदृश्यच झाले ! भारतवर्षावर प्रसंगपरंपरा येत असतां त्यांना असं अदृश्य कसं रहावलं ? काकाजी, यांत कांहीं गूढ तर नसेलना ?

**काकाजीः**—ताईसाहेब, यांत जर कांहीं गूढ असेलच, तर तें उकलण्याला आपला हा सेवक असमर्थ आहे.

**कमलाः**—अशा या बोलण्यानं आपण मला अधिकच गूढांत पाडीत आहांत.

**काकाजीः**—मी मघाशीं आपणाला सांगितलंच, कीं आपल्या मागं इथं गुप्त हेर—

**कमलाः**—काकाजी, आपण कांहीं म्हणा, पण इथं कुणाला गुप्तपणानं राहतां येईलसं मला वाटत नाहीं.

**काकाजीः**—कां बरं ? खुद्द आपण आपलं स्वरूप झांकून इथं छद्म-वेषानं राहिलां आहांत ना ?

**कमलाः**—माईच्या अनुमतीनं मी तशी इथं राहिलें आहें. शिवाय मी इथं सदिच्छेनं राहिलें असून माझ्या राहण्यांत कपट नाहीं. माईच्या

सात्त्विक श्वासानं भरलेल्या या पवित्र वातावरणांत कपटी गुप्तवेषानं कुणालाही रहातां येणं शक्य नाहीं. छायेला कधीं प्रकाशांत गुप्तपणानं रहातां येईल का ?

**काकाजी**:—तर मग ताईसाहेब, आनंदा म्हणाला, कीं छायाच—

**कमला**:—काय वाजलं तिकडे ? कोण आहे ?

**छाया**:—( प्रवेश करून ) मी आपली छाया, ताईसाहेब.

**कमला**:—तूं कां ? नांव निघायचा अवकाश, कीं पाठीशीं हजर ! कां आली होतीस ? तुला नव्हती हांक मारली.

**छाया**:—हांक ऐकून नाहीं आलें ताईसाहेब. माई आपली चौकशी करीत होत्या, हे कळवायला आलें.

**कमला**:—त्यांना झोंप नव्हती लागली ?

**छाया**:—छेः, मघांचा तो वीरनवालीचा आलाप ऐकल्यापासून वनवासी रामचंद्रजींच्या तसबिरीसमोर त्या ध्यानस्थ बसल्या होत्या. ध्यान आटो-पतांच त्यांनीं आपली चौकशी केली.

**कमला**:—बरं, तूं जा. मी आलेंच तिकडं. [ **छाया** जाते.

**काकाजी**:—ही दासी आपण इथं येण्याच्या आधींपासूनच आहे काय ?

**कमला**:—नाहीं, माझ्या मागून थोडे दिवसांनीं आलेली आहे. आपणाला हिचाच संशय येतो कीं काय ?

**काकाजी**:—होय. कारण आनंदानं हेंच नांव सांगितलं.

**कमला**:—बरं तर. आनंदाला म्हणावं, मी आतां सावध राहीन. आतां मी माईकडं जातें. तिचं मन बरंच अवस्थ झालं आहेसं दिसतं. जाऊन थोडं समाधान करतें. आणि उद्यांच्या दरबारला जाण्याबद्दल तिची अनुमतीही विचारून ठेवतें. पण काकाजी, आपणाबरोबर-एक संदेश पाठवायचं मघांपासून फार मनांत येत आहे. पाठवूं का ?

**काकाजी**:—मग ताईसाहेब, या सेवकापाशीं असा संकोच ?

**कमला**:—संकोच आपणाशीं नाहीं. ज्यांना तो पाठवायचा, त्यांना तो कितपत रुचेल कोण जाणें ? उद्यांच्या प्रसंगीं दीनदासजींनीं परावृत्त व्हावं, म्हणून जर माझ्याच नांवानं मी त्यांना—

**काकाजी**:—आपल्या नांवानं ?

**कमला**:—म्हणजे राजभगिनी कमलादेवी म्हणून नव्हे हो ! उंहूं !

छेः ! मी कोण हें फक्त स्वामीजी आणि माई यांनाच ठाऊक आहे. दीनदासजींना मुळींच ठाऊक नाहीं. आणि त्यांना हें कळतांही कामा नये. या संजीवनालयांतील मुख्य परिचारिका किसनकुमारी—

**काकाजीः**—परिचारिका किसनकुमारी यांच्या नांवानं मी त्यांना कोणता संदेश सांगूं ?

**कमलाः**—उद्यांचा दिवस उजाडण्यापूर्वीं आपण त्यांची गांठ घ्या आणि विनंति करा, युद्धांत आपण जखमी झाल्यामुळं माईबरोबर आपली सेवा करण्याचं भाग्य लाभलं, इतकाच जिचा अधिकार, तिनं आपणाला विनंति काय करावी ? स्वामीजी नाहींत, माई अत्यंत क्षीण–उद्यांच्या प्रसंगीं आपण परावृत्त व्हाल का ?–पण छेः, आपणाला विनंति काय करावी, हेंच या परिचारिकेला समजत नाहीं, इतकीच या किसनकुमारीची आपणाला विनंति आहे. [पडदा पडतो.

---

## प्रवेश तिसरा.

[**स्थळः**—विजयस्तंभाच्या टेंकडीचा पायथा.
**छाया** धांपा टाकीत प्रवेश करते.]

छायाः—सुटलें–निसटलें बाई एकदांची ! आपल्या टापूंत आलें ! त्या मेल्या संजीवनालयाच्या भिकारड्या हवेंत कसं गुदमरल्यासारखं झालं होतं. सदा उघडकीला यायची चोरी ! ही पहा–ही पहा बिचारी सरत्या रात्रीची छाया कशी निसटून अगदीं माझ्यासारखी धांपा टाकीत चालली आहे ! असो म्हणा, आतां आपल्या टापूंत आलें. हीच ती टेकडी, हो–हीच. आणि तो–दूर–माथ्यावर विजयस्तंभ. या निसटत्या छायेंत कसा भेसूर दिसतो आहे ! ( एकदम दचकून ) काळं-काळं-काय दिसलं त्याच्या त्या पायथ्याच्या चबुतऱ्यावर ? पहांटेची निसटती छाया जशी कांहीं एकवटूऽऽन-तिथं बसली आहे ! कशी एकाद्या दुश्चिन्हासारखी दिसते ! जा, पळ बाई पळ, नाहींतर–अगबाई, खरंच पळाली कीं ?–कां माझ्या कल्पनेचा भ्रम ?

**हेराध्यक्षः**—( दुसऱ्या बाजूनें झटपट् येऊन ) प्रभा !

**छायाः**—जळळी मेली तुमची प्रभा ! अहो हेराध्यक्ष, तुमची प्रभा त्या

संजीवनालयांत मरून गेली—जळून राखरांगोळी होऊन तिची आतां भुता-सारखी छाया राहिली आहे!

**हेराध्यक्षः**—तुझी ही बडबड बंद कर. अगोदरच यायला उशीर केला आहेस. आतां उजाडलं, कीं माणसांची इथं गर्दी होईल. कालपासून या रस्त्यानं विजयस्तंभाकडं सारखी रीघ लागून राहिली आहे. झट्पट् तुझी संजीवनालयांतली कामगिरी काय ती सांग.

**छायाः**—अहाहाहा! काय पण संजीवनालय! नांव मोठं न् लक्षण खोटं! तिथं जशी ही प्रभा मरून तिची छाया झाली, तशीच आमच्या कमलादेवी ताईसाहेब—

**हेराध्यक्षः**—प्रभे, तुझा फाजीलपणा फारच वाढत चालला!

**छायाः**—तसं नव्हे. मी जशी तिथं छाया झालें, तशा ताईसाहेब तिथं परिचारिका झाल्या आहेत.

**हेराध्यक्षः**—तें अमात्यांना ठाऊक आहे. अमात्यांना ताईसाहेबांच्या अंतःकरणाचा ठाव पाहिजे.

**छायाः**—कां? म्हातारचळाची छाया आली वाटतं?

**हेराध्यक्षः**—चूप! ऐकून घे नीट. सेनापति उग्रसेन यांनीं ताईसाहेबांना मागणी घातली होती. अमात्य व सरदारमंडळ या सर्वांचा त्या मागणीला पाठिंबा होता. महाराजांनाही ती गोष्ट पसंत होती—

**छायाः**—मग मध्यें कोणाची छाया आडवी आली?

**हेराध्यक्षः**—ताईसाहेबांनींच ती मागणी नाकारली. म्हणून त्यांच्या अंतःकरणाचा ठाव तरी काय आहे, तो अमात्यांना जितक्या लवकर कळेल तितका पाहिजे आहे.

**छायाः**—अस्सं, अस्सं! आतां आलं लक्षांत. बरं, तर मग अमात्यांना असं विचारा कीं, एखादी अत्यंत उच्च दर्जाची उपवर तरुणी, एखाद्या भिकारड्या तरुण योद्धयाची सेवा आपल्या हातून घडली, म्हणून जर मोठी धन्यता मानूं लागली, तर त्या तरुणीच्या अंतःकरणाचा ठाव आपण काय समजाल?

**हेराध्यक्षः**—काय काय, त्या तरुणाचं नांव काय?

**छाया**:—हें ग काय बाई ? आपणाला ताईसाहेबांच्या अंत:करणाचा ठाव पाहिजे कां एखाद्या तरुणाचं नांव पाहिजे ?

**हेराध्यक्ष**:—आलीस पुन्हा वळणावर ? प्रभे, आतां इथं माणसं जमूं लागतील. आटप लवकर, आणि आपल्या वाटेनं जा.

**छाया**:—कुठं, त्या संजीवनालयांत ? नको ग बाई, तिथं पुन्हा जाणं नको. तिथं आतां छायेला रहायची सोय नाहीं.

**काकाजी**:—(प्रवेश करून) छायेला रहायाची आतां कुठंच सोय नाहीं. तो पहा सहस्ररश्मी सूर्यनारायण ! त्याचा उदय झाल्यानंतर छायेला कुठं राहतां येईल ? भगवान् सूर्यनारायणा ! आमच्यावर आलेलं छायेचं पटल तुझ्यावांचून कोण दूर करणार ? (छायेकडे वळून) कस काय छायाताई ? ताईसाहेबांची अनुमति घेऊन तुम्ही निघालांत, पण फारच दौड केलीत !

**छाया**:—हा माझा आतेभाऊ अमात्यांच्या तैनातींत असतो. त्याचा निरोप होता, कीं आजच्या समारंभाला फार गर्दी होईल; तेव्हां लवकर आलीस तर जागेची सोय करतां येईल. म्हणून जरा घाई केली. आपणही समारंभाच्या ओढीनं मागोमाग आलांतच (हेराध्यक्षास एकीकडे) ताईसाहेबांचा हा विश्वासू सेवक खरोखर कोणत्या ओढीनं इकडे आला आहे, हें जर आपण हेरलंत —

**हेराध्यक्ष**:—तर काय ?

**छाया**:—तर ताईसाहेबांच्या तरुण योद्धयाचं नांव—

**हेराध्यक्ष**:—चूप ! तें पहा कोण येत आहे.

[ **मोतीराम** प्रवेश करतो.

**मोतीराम**:—म्हणे चूप ! ही मुस्कटदाबी आपल्याला नाहीं मंजूर !

**हेराध्यक्ष**:—( छायेस एकीकडे ) अरे, हा त्या दीनदासाचा मोत्या !

**छाया**:—तर मग तो तरुण योद्धा—

**हेराध्यक्ष**:—सावध !

**मोतीराम**:—बोलूनचालून आमचं कुत्र्याचं जातक, आणि म्हणे भोंकायचं नाहीं ! नुसतं गुरगुरायचं देखील नाहीं ! कुठं वेडविद्रं, काळंबेरं दिसलं, कुठं काळोखांत कांहीं खुजबुजलं, कुठं एखादी निसटती छाया दिसली, कीं कुत्रं गुरगुरायचंच !

**काकाजीः**—कोण मोतीराम ?

**मोतीरामः**—होय, तुमच्या माईजींचा मोत्या. मोत्या म्हणून म्हणायचं आणि भोंकूं तर द्यायचं नाहीं !

**काकाजीः**—हें कुत्र्याचं वेड—

**मोतीरामः**—वेड ? कुत्रा म्हणजे काकाजी आपण हलका प्राणी समजतां ? त्याच्या इतकं इमान कुठं तरी सांपडेल ? वेळीं एखाद्याची छाया देखील त्याला सोडील, पण कुत्रा आपल्या मालकाला सोडायचा नाहीं !

**काकाजीः**—दीनदासजींची छावणी इथं जवळच आहे तर ?

**मोतीरामः**—हम् नहीं जानते !

**काकाजीः**—कुत्र्यानं मालकाला सोडलं वाटतं ?

**मोतीराभः**—हम् नहीं जानते !

**काकाजीः**—पण हें गुरगुरणं कोणावर ?

**मोतीरामः**—हम् नहीं जानते ! काकाजी, आपण स्वामीजींच्या आश्रमांत कधीं कधीं येत असा- ?

**काकाजीः**—होय, मोतीराम.

**मोतीरामः**—स्वामीजी कुत्र्यांना किती मान देत ? आपल्या मृगासनावर घेऊन बसायचे ! गुरगुरलीं तर कुरवाळून गोंजारायचे ! गोंजारल्यावांचून कुत्रीं कुणाला वळत नसतात !

**काकाजीः**—खरं आहे मोतीराम. चुकलों आम्ही. पण—

**मोतीरामः**—तशाच माई ! माईचं गोंजारणं म्हणजे अहाहा ! कुत्रींच काय—बडे बडे झुंजार !—काकाजी, अनुसूयेकडं मोठ्या तावानं आलेले देव पाळण्यांतले छावे बनले, नाहीं ?—अरे, पण हो, मी कुत्र्यांची योग्यता सांगत होतों, नाहीं ? माईचं नांव निघालं, कीं एकदम भूल ! सगळी भूल ! काकाजी, कुत्र्याची योग्यता सामान्य नाहीं !–समजलों, समजलों; हेरला आपला हेतू. आपल्याला या मोत्याच्या मालकाला कांहीं महत्त्वाचा संदेश सांगायचा आहे–जा, जा. या कुत्र्याजवळ बोलायला आपल्याला सवड नाहीं. जा, माणसाच्या स्वाऱ्या त्या धर्मशाळेपलीकड आहेत. जा.

**काकाजीः**—बागडल्या गोंजरल्यावांचून जातो, माफ करा मोतीराम. पण.काम खरंच महत्त्वाचं आहे. [जातो.

**छाया:**—(हेराध्यक्षास एकीकडे) हें खरंच महत्त्वाचं काम म्हणजे बाईसाहेबांचा संदेश. काय तो मागून सांगेनच. पण आला कां आतां तरुण योद्धा लक्षांत ?

**हेराध्यक्ष:**—आला. आणि तोच जर ताईसाहेबांच्या प्रेमाचा विषय असेल, तर हे ऐकून आमात्यांची चिंता कमी होण्याऐवजीं उलट दुणावेल मात्र.

**मोतीराम:**—(स्वगत) मघांपासून पाहतों आहे, या दोघांचा वास कांहीं वेगळाच येत आहे. [पडद्यांत पुढील गीत ऐकूं येतें.

**त्रिखंड हिंडुनि धुंडितसे । न परि हरपलें तें गवसें ॥**

**मोतीराम:**—(कान आश्चर्यानें टवकारल्यासारखे करून) कोण ? स्वामीजींच्या लाडक्या कृष्ण कवीचं हें गीत कोण इतक्या भक्तीनं म्हणत आहे ? जागृतीची तुतारी फुंकणाऱ्या कृष्णा ! तूं अल्पायु झालास; पण अजरामर आहेस ! हा मोत्या तुझा मोठा लाडका होता नाही ?

[पुन्हा पडद्यांत गीत—

**चुकचुकल्या परि ।**
**वाटे अंतरिं ।**
**होउनि बावरि ।**
**निज श्रेय मी पाहतसें । न परि हरपलें तें गंवसें ॥**

**हेराध्यक्ष:**—(छायेस एकीकडे) अरे, हा तर महाराजांचा आवडता खुषमस्कऱ्या ! महाराजांना सोडून एकटीच इकडं कुठं भटकली स्वारी ?

[**खुषमस्कऱ्या** गीताचा प्रथम चरण म्हणत प्रवेश करतो.

**खुषमस्कऱ्या:**—त्रिखंड कां ?—नवखंड हिंडलों, कुठं पत्ता नाहीं ! आता स्वर्गांत—हो, स्वर्ग म्हणजे नाक. हिमालयाचं नाक ! तिकडं जर पत्ता लागला—एखादा हेर तिकडं पाठवायला मिळेल——

**हेराध्यक्ष:**—खुषमस्करेमहाराजांचा विजय असो !

**खुषमस्कऱ्या:**—कोण हेराध्यक्ष ? वा:, अगदीं शंभर वर्षें आयुष्य ! पण, अरे ! अरे ! अरे ! मग तुम्ही इतक्यांत स्वर्गाला हो कसे जाणार ? अनायासं योग आला होता ! कोण बाईसाहेब ? आपली कांहीं सहगमनाची पुण्याई ? बाकी सहगमन करण्याची खरी पुण्याई कुणाला—?

**हेराध्यक्षः**—कुणाला ?

**खुपमस्कऱ्याः**—छायेला ! मोत्या, तूं मघांपासून काय हुंगतो आहेस रे ? तुला कांहीं पत्ता लागला आहे का ? बाप्पाजी—

**मोतीरामः**—बाप्पाजीचं नांव घेणारा तूं कोण ? स्वामीजींना बाप्पाजी म्हणण्याचा जिव्हाळ्याचा अधिकार फारच थोडयांना आहे. हो, बाप्पाजींचा आनंद—

**खुपमस्कऱ्याः**—बरोबर, बाप्पाजींचा तो आनंदाश्रम ! तिथला दरबार मोठा वैभवशाली, नाहींरे ? त्यांत नवरत्न होतीं ! आपला कृष्ण कवि त्यांतलंच एक रत्न ! बेटा खुषींत आला, कीं श्रीकृष्णाच्या भाषेत नेहमी बोलायचा, माझे पूर्वी अनेक जन्म होऊन गेले, आणि पुढंही अनेक होतील ! गेला बिचारा ! पण त्यानं मनाच्या अवस्था कशा बरोबर हेरल्या आहेत. ( हेराध्यक्षास ) कां हो तुम्ही हेरतां का ? काय पडताळा पटतो आहे ! 'त्रिखंड हिंडुनि धुंडितसें । न परि हरपलें तें गंवसे ॥' काय करूं मोत्या, पत्ता नाहीं !

**हेराध्यक्षः**—खुपमस्करेमहाराजांची कोणती वस्तु हरवली आहे ?

**खुपमस्कऱ्याः**—तप्कीऽरीचीऽऽडबी ! आहे कां कुणाजवळ ?

**एक शेटः**—( प्रवेश करून ) ही घ्या, ही घ्या, महाराज. अस्सल द्राविडी तपकीर आहे !

**खुपमस्कऱ्याः**—माफ करा शेटजी, तिचा विनियोग असा द्राविडी करावा लागेल ! ( द्राविडी प्राणायामाचा विनियोग करून दाखवितो. )

**शेटजीः**—छेः, छेः! महाराज, फार लज्जतदार तपकीर आहे, बरें ही ! आपल्या सेनापतींना हिचा फार शौक !

**खुपमस्कऱ्याः**—खरंच ! मोत्या, तुला ठाऊक नाहीं का ? आमच्या सेनापतींना हिचा इतका शौक, कीं गेल्या युद्धांत जेव्हां जेव्हां शत्रूवर निकराचे हल्ले चढवण्याची वेळ येई, तेव्हां तेव्हां उल्हाट यंत्रांत दारूचे बार भरण्यापूर्वी सर्व सैनिकांना नाकांत पहिल्यानं हिचा बार भरण्याचे ते हुकूम सोडीत !

**शेटजीः**—आहे, आहे, खुपमस्करेमहाराजानीं हिची कीर्ति ऐकली आहे ! सगळ्या सरदारमंडळाला हिची लज्जत लागली आहे ! ( दोन्ही

हात चोळीत हळूच ) म्हटलं, युद्धाचे वेळीं सामुग्री पुरविण्याचा मक्ता जसा आपल्याकडं होता, तसा हिचाही मक्ता म्हटलं, आपल्याकडंच आहे. खुपमस्करेमहाराजाना हिची कधींच वाण पडायची नाहीं. विनंति इतकीच कीं, ही एकदां खुद्द महाराजांच्या कानीं—

**खुपमस्कऱ्याः**—कानीं का नाकीं ? पण काय हो शेटजी, ही तुमची द्राविडी तपकीर म्हणजे कुंभकर्णी तपकीर ! तपकिरीचा षौक करावा असा कुंभकर्णानंच ! षौकालायक नाक ! आणि एकदां बार भरला, कीं–कुंभकर्णी झोंप ! कुंभकर्णी झोंप म्हणजे काय, ठाऊक आहे ना ?

**शेटजीः**—हं हं हं हं हं हंऽऽऽसहा महिन्यांची रात्र !

**खुपमस्कऱ्याः**—नुसती नव्हे. जगाची लंका झाली तरी रात्रच ! नवग्रह पलंगाखालीं जावोत, अशोकवनांत शोक होवोत, मारुतीचं शेंपूट वाढत जावो, झोंपच झोंप ! असा या तुमच्या तपकिरीचा प्रभाव आहे ! सेनापतिप्रभृति सरदारमंडळाला ही प्यार झाली, ती काय उगीच ? पण आपल्याला बोवा अलीकडं झोंपेचं फार भय वाटूं लागलं आहे. भलभलतीं स्वप्नं पडतात ! नाहीं नाहीं ते आलाप ऐकूं येतात ! कानांचा बचाव ( टोपीच्या कानांकडे बोट दाखवून ) या दरबारी कानांमुळं सहज होतो.

**शेटजीः**—दरबारी कान ?

**खुपमस्कऱ्याः**—कां ? खुपमस्कऱ्याच्या या टोपीला आहेत हे !

**शेटजी**—हे गाढवाचे कान !

**खुपमस्कऱ्याः**—तेच दरबारी कान ! दरबारला उघड वापरण्याची लाज वाटते म्हणून खुपमस्कऱ्याला लावतात !

**शेटजीः**—पण हे दरबारी कान कसे ?

**खुपमस्कऱ्याः**—गाढवापुढं गाइली गीता, दरबारापुढं गाईली गाऱ्हाणीं; कांहीं उपयोग ? दोघेही बहिरोबा ! सारख्या कानाचे ! म्हणून हे दरबारी कान ! यानं आमच्या मात्र कानांचा सहज बचाव होतो. तरी पण झोप–मोत्या, झोंप घालवणारी ती बाप्पाजींची तपकीर ! हिमालयांतील तपोनिधींनीं आपल्या तपानं तयार केलेली, कैलास पर्वतावर शंकरांनीं ती आपल्या तळहातावर घेतली होती, जटेतून वाहणाऱ्या आकाशगंगेंत तिला पावन करून मस्तकावरील चंद्रकलेच्या ठायीं असलेल्या मृगाच्या नाभींतील

कस्तुरीचीं तिला पुटं दिलीं होतीं ! त्या तपकिरीची डबी मोत्या कुठं गंवसत नाहीं रे ! (त्रिखंड हिंडुनि धुंडितसे इ० पूर्ववत्.)

**शेटजीः**—काय हो महाराज, पुन्हा युद्ध होणार आहे म्हणे ?

**मोतीरामः**—हो, हो ! होणार आहे ! आणि त्यासाठीं गेल्या युद्धांत गब्बर झालेल्या गलेलठ्ठांना तोफेचे गोळे म्हणून वेठीला धरायचं ठरलं आहे !

[ कांहीं **नागरिक** प्रवेश करतात.

**एक नागरिकः**—कोण म्हणतो युद्ध होणार आहे ?

**दुसरा नागरिकः**—कोणाला अजून ही युद्धाची महामारी हवीशी वाटते ?

**खुपमस्कऱ्याः**—वैद्यबुवांना !

**एक नागरिकः**—या शेटजीना होय ?

**दुसरा नागरिकः**—देवा ! तुझ्या कृपेनं सुकाळ झाला, तरी धान्याच्या कोठारांना मुद्दाम आगी लावून दुष्काळ पाडणारे मक्तेदार, परचक्राचं भय दाखवून क्षात्रतेजाची आग भडकती ठेवणारे सरदार लोक, दिग्विजय करण्याची हाव बाळगणारे महत्त्वाकांक्षी राजेरजवाडे या सर्वांना युद्ध हें जीवन झालं, तर आम्हां गोरगरिबांना शांतिसुख कसं मिळावं ?

**खुपमस्कऱ्याः**—युद्धानं ! कांट्यावांचून गुलाब नाहीं, युद्धावांचून शांति नाहीं ! सूर्याचा जसा अरुण, तसा युद्ध हा शांतिदेवीचा सारथी आहे ! युद्धाचा आरक्तवर्ण अरुण उदय पावल्याखेरीज जगाला शांतिदेवीचं सुंदर दर्शन व्हावं कसं ? [ पडद्यांत दवंडी—

[ ऐका, ऐका ! भारतवर्षाचे सर्व सामंत, सरदार, मानकरी हो, त्याचप्रमाणं शेठसावकार, नागरिक आदिकरून अखिल प्रजाजन हो ऐका, भारतवर्षाचे महाप्रतापी सम्राट कुमारसिंह यांची ही राजाज्ञा ऐका ! ]

[ **कोतवाल, रक्षक, व दवंडीवाले** येतात.]

**कोतवालः**—लोकहो, सम्राटांची राजाज्ञा या चौकीच्या चव्हाट्यावर सर्वांना नीट ऐकवा.

**दवंडीवालाः**—( दवंडी पुकारतो ) गेल्या महायुद्धांत महाराजांना मिळालेला अपूर्व विजय हा शांततादेवीचा विजय असून तिच्या विजयार्थ उभारलेल्या विजयस्तंभापाशीं मोठा दरबार भरवून महाराजांनीं तिचा आज महोत्सव करण्याचं ठरवलं आहे. सूर्याचा रथ आकाशांत मध्य

बिंदूवर येऊन स्थिर होतो, तोच शांततादेवीच्या पूजनाचा सुमुहूर्त असून त्याक्षणीं अखिल साम्राज्यांतील चराचरांनीं आपले सर्व व्यापार बंद ठेवून शांततादेवीचं शांत चित्तानं पूजन करावं अशी महाप्रतापी सम्राट् कुमार-सिंह यांची सर्वांस राजाज्ञा आहे हो !

**खुषमस्कऱ्याः**--ॐ शांतिः! शांतिः!! शांतिः!!! सम्राटांच्या राजाज्ञेचा विजय असो ! कोतवालसाहेब आपण ही राजाज्ञा वनाधिपती सामंत मृगराज यांना ऐकवली आहे ना ? लाटाधिपति सागरराज यांजकडेही गेलीच असेल ! अंतरिक्षाधिपति राजे मरुद्गण यांजकडे जायची राहील बरं ? त्याचप्रमाणं आपले पाळण्यांतले हजारों सामंत ? मातेच्या मांडीच्या सिंहासनावर विराजमान होणारे मांडलिक ? त्यांना ही राजाज्ञा, नीट ऐकवा बर ! नाहीं तर त्यांनीं ऐन वेळा जर ट्यांहॉं केल तर महायुद्धाचा खटाटोप वांया जाईल !

**कोतवालः**—(हंसत) खुषमस्करेमहाराजांचा विजय असो ! दूतहो, जा आणि जीं जीं ठिकाणं तुम्हांला नेमून दिलेलीं आहेत, त्या त्या सर्व ठिकाणीं ही राजाज्ञा ऐकवा. [दंवडीवाले जातात] रक्षकहो, या राजाज्ञेचा अम्मल सर्वत्र योग्य रीतीनं होतो किंवा नाहीं, हे पाहण्याचं काम तुमच्या-कडं आहे. हिचा जरा कुणीं अवमान केलेला दृष्टीस पडला, कीं तुमच्या हातांतील राजदंडांनीं बेलाशक लगुडप्रहार करून शांतता प्रस्थापित करायला चुकूं नका.

**एक नागरिकः**—कोतवालसाहेब, विचारतां माफ करा हं. शांतता देवीचा जर विजयच झालेला आहे, तर मग हा राजदंड आणि त्याचा लगुडप्रहार याच कारण काय बरं ?

**कोतवालः**—तें तुमच्या दीनांच्या दासांना विचारा !

**मोतीरामः**—त्यांना काय म्हणून ? सरदारमंडळालाच विचारा !

**कोतवालः**—सरदारमंडळ म्हणजे या लोकांच्या डोळ्यांत खुपरी-सारखं खुपत असतं ! पण सम्राटांची सर्व साम्राज्य-सत्ता, या भारत-वर्षाचं दैदीप्यमान वैभव हीं केवळ सरदारमंडळामुळं आहेत, हें यांच्या खुपऱ्या डोळ्यांना कुठं दिसतं ? हे सरदारमंडळ नाहींसं होऊं द्या, भारत-वर्षावर सर्वत्र नांगर फिरेल !

**मोतीरामः**—बहार होईल ! आमचा देशच मुळीं कृषीवलांचा आहे.

सरदारमंडळाचे टोलेजंग दुर्ग, त्यांच्या विलासांचीं वनं, उपवनं, मृगयावनं, भूमि उध्वस्त करणारा त्यांचा उन्मत्त संचार हीं नाहींशीं होऊन सर्व देश जर नांगरून निघेल, तर गरीब प्रजेच्या पाठीचा दुष्काळ नाहींसा होऊन त्यांना सुखानं पोटभर खायला तरी मिळेल.

**कोतवालः**—रक्षकहो, या दीनदासाच्या लोकांवर नीट नजर ठेवा. विजयस्तंभाकडं आज ते जमावानं येतील. त्यांची जरा जर गडबड दिसली—जिथल्यातिथं त्यांना एकदम कैद करा ! [एक सुखवस्तु **नागरिक** येतात.

**सुखवस्तु नागरिकः**—खरंच, या दीनदासाचा आणि त्याच्या लोकांचा कायमचा बंदोबस्त झाला पाहिजे !

**शेटजीः**—अलबत् झालाच पाहिजे !

**सुखवस्तु नागरिकः**—अहो, सुखानं अन्न खाऊं देत नाहींत !

**मोतीरामः**—यांच्या अन्नांतल्या कोंबड्या काय दुष्ट आहेत हो ! माना मुरगळतांना ओरडतात ! सुखानं खाऊं सुद्धां देत नाहींत !

**शेटजीः**—भारी चढेल आणि बेफाम लोक झालेत हो कोतवाल-साहेब ! कुणाचं बरं म्हणून यांना पहावत नाहीं.

**नागरिकः**—कुणाची कदरच या राज्यांत नाहीं, असं त्यांना वाटूं लागलं आहे.

**कोतवालः**—काय करावं, अमात्य जरा माघार घेतात, नाहीं तर सेनापतिसाहेबांनीं असा दरारा बसवला असता !

**खुषमस्कऱ्याः**—ॐ शांतिः ! शांतिः !! शांतिः !!!

**कोतवालः**—रक्षकहो, तुम्ही आपापल्या जागीं जाऊन उभे रहा. आणि सांगितल्याप्रमाणं सर्व बंदोबस्त नीट ठेवा. जयहर, खुषमस्करे महाराज. [**रक्षक** व **कोतवाल** जातात.

**हेराध्यक्षः**—( छायेस एकीकडे ) प्रभे, चल. आपणही समारंभाला सुरवात होण्यापूर्वींच अमात्यांची भेट घेऊन लोकवार्ता त्यांच्या कानीं घालूं.

[ जातात. काखेत काव्याचं भेंडोळं घेतलेले एक कवि येतात.

**कविः**—जयहर, खुषमस्करेमहाराज जयहर ! म्हटलं आजच्या प्रसंगाला आपल्या महाराजांवर हें एक काव्य केलं आहे !

**खुषमस्कऱ्याः**—आपण कविराज वाटतं ?

**कविः**—होय, कल्पनाकल्पद्रुम अशी पदवी आहे या दासाला !

**खुपमस्कऱ्याः**—जय शारदे ! आतां तुझीच कृपा आमच्यावर !

**कविः**—खुपमस्करेमहाराजांची भेट झाली, माझं भाग्यच मला भेटलं म्हणायचं ! कोकिळाला वसंत,चातकाला मेघ,चकोराला चंद्र,पुष्पाला भृंग—

**खुषमस्कऱ्याः**—बजवय्याला मृदंग,हातोड्याला ऐरण,तरवारीला गर्दन—

**कविः**—बस्स, बस्स, बस्स ! तसा कवीला श्रोता !

**खुपमस्कऱ्याः**—काय लाखांतली गोष्ट बोललांत ! हे ब्रह्मकुमरी ! ब्रह्मलोकीं पित्याच्या अंकावर बसली असतांना आमची करुणावाणी तुझ्या कानीं पडूं दे ! तुझ्या कृपेनं मुक्यांची वाचा फुटते, पांगळ्यांचे पाय फुटतात, मग आमचे यावेळीं कान कां नाहीं फुटणार ? यावें कविराज ! आपली शब्दसृष्टि कानामात्रासुद्धां बरोबर आहे ना ? आमच्या कानावर किती मात्रांचे वळसे देणार ?

**कविः**—कांहीं नाहीं, फक्त एक दोन बहारीच्या कल्पना वाचून दाखवतों, त्या तेवढ्या महाराजांच्या कानीं—

**खुपमस्कऱ्याः**—अरे वा, आज महाराजांच्या कानावर बरीच कर्ण-भूषणं चढायचीं आहेत ! शेठजींची द्राविडी तपकीर, या कल्पद्रुमांच्या कल्पना, वेळनूसार आमचीही दरबारी कानटोपी ! आणखी कांहीं कुणाचं असलं तर येऊं द्या, म्हणजे चौकडा होईल !

**कविः**—ही ही एवढी—एवढी एकच कल्पना. फार बहारीची आहे ! अजून पद्यांत घालायची आहे, पण तशीच वाचून दाखवतों. ( वाचतो ) हे राजा ! तूं अतुल पराक्रमानं प्रस्थापित केलेल्या शांततेचा तिन्ही लोकीं जयजयकार होत आहे ! आणि स्वर्ग-भू-पाताल येथील प्रजांना, आमच्या शांतिसौख्याचा अत्यंत हेवा वाटत असून, पाताळांतील रसरसणारे अग्नि-रस, सागरांतील वडवानल, इंद्राचे मेघ, अंतराळांतील मरुद्गण हे सर्व तुझा आश्रय मिळण्याविषयीं आतुर झाले आहेत. इतके कीं, त्या सर्वांच्या तोंडाला भयंकर पाणी सुटलं असून, त्या पाण्यानं अकालींच जलप्रलय होतो कीं काय अशी देवादिकांना मोठी भीति पडली आहे ! एवढ्यासाठीं—

**खुषमस्कऱ्याः**—थांबा, थांबा. अहो कल्पनाकल्पद्रुम, त्या तुमच्या जलप्रलयापूर्वींच हा कल्पनाप्रलय होतो आहे, तो जरा थांबवा. आणि

आम्हांला सांगा, कीं हें जलप्रलयाचं वगैरे अद्भुत वर्तमान आपणाला कोठून कळलं ?

**कविः**—कोठून कळलं म्हणून काय विचारतां ? अहो, कवीचं सामर्थ्य कांहीं असं तसं नाहीं ! अहो, जें न देखे रवि, तें देखे कवि !

**खुषमस्कऱ्याः**—जें न देखे रवि, तें देखे कवि ! मग रवीचं तेज लोपलं म्हणायचं ?

**मोतीरामः**—हो तर ! रवीला ग्रहण लागतं तें कुणाचं ?

**खुषमस्कऱ्याः**—यांचं ? वाः ! मग या दुःखीकष्टी खुषमस्कऱ्याला आज त्याचं मात्र भाग्य खरोखर भेटलं म्हणायचं ! जें न देखे रवि, तें देखे कवि ! कविराज, आपल्या दृष्टीचा इतका जर संचार आहे, तर या दुःखितावर कृपा करा, आणि त्याची तेवढी हरवलेली तपकिरीची डबी कुठं दिसते का बघा हो !

**कविः**—म्हटलं एवढी ही कल्पना अर्धवट—

**खुषमस्कऱ्याः**—अहो अर्धवट ! राहूं द्या तशीच. ते पाहिलेत, . या राज्यांतल्या शांततेचा भंग करूं पाहाणारे शिरोमणी दीनदास इकडे येत आहेत, त्यांना तुमचा हा शांतिपाठ फारसा रुचायचा नाहीं.

[ **दीनदास** व **काकाजी** बोलत येतात.

**दीनदासः**—काकाजी, किसनकुमारी देवीच्या विनंतीचा अव्हेर या दीनदासाकडून कसा होईल ? देवींना माझी उलट विनंति इतकीच कळवा कीं, आमच्या या क्षुद्र देहांना एकदां युद्धांतच काय त्या जखमा झाल्या. पण युद्ध काय, किंवा शांतता काय, भारतवर्षांतील आमच्या गरीब अबलांच्या–फार काय, केवळ अबला अशा या भारतभूच्या हृदयाला ज्या अहर्निश जखमा होत आहेत, त्यांकडे जर आम्हीं डोळेझांक केली, तर आमच्या जखमा भरून काढण्यासाठीं आपणांसारख्यांच्या कोमल हातांना आम्हीं व्यर्थ कष्ट दिले, असंच होणार नाहीं काय ?

**खुषमस्कऱ्याः**—ॐ शांतिः ! शांतिः ! ! शांतिः ! ! !

**दीनदासः**—कोण आनंदा ? किती दिवसांनीं भेटलास ! तुला हा पेशा पत्करावासा वाटला, नाहीं ?

**मोतीरामः**—तोंड दाबलं, तर नाक सुद्धां उघडूं नये, हा कुठला न्याय ?

**खुषमस्कऱ्याः**—आणि तपकिरीची डबी नाहीं, तर नाक उघडून तरी करायचं काय ?　　　[ इतक्यांत विजयस्तंभाकडे तोफ होते.

**कविः**—अरे ! ही तर समारंभाच्या पूर्वसूचनेची तोफ ! अजून हीं पद्यं व्हायचीं आहेत कीं ?　　[ काव्यप्रसूतिवेदना दर्शवीत येरझारा घालतो.

**दीनदासः**—मोतीराम, आतां दोन घटकांनीं सभागृहाचीं द्वारं खुलीं होऊन समारंभाला आलेल्या मंडळीला आंत सोडूं लागतील. आपल्या लोकांना मीं समजावून सांगितलंच आहे. कोणी यत्किंचितही गडबड केली, तर आपला सभागृहांत प्रवेशच होणार नाहीं. आणि आपला या वेळीं प्रवेश तर झालाच पाहिजे. म्हणून कोणीही कोणत्याही कारणांनीं मनाची शांति ढळूं न देतां, मुकाट्यानं प्रथम सभागृह गांठा.

**खुषमस्कऱ्याः**—हं चला, पळा कविराज ! आपलं पदलालित्य दाखवायची खरी वेळ हीच आहे !　　　[ सर्व जातात.

---

## प्रवेश चौथा.

[ **स्थळः**—विजयस्तंभानजीक सरदारमंडळाची छावणी.
पात्रें:—**सेनापति व मायावती.** ]

**मायावतीः**—विजयी सेनानायक आज दरबारांत शांततादेवीचा जयजयकार करणार. पण प्रथम त्यांचा जयजयकार करायला ही मायावती मुद्दाम आली आहे !

**सेनापतिः**—सम्राटांच्या क्रीडामंदिराची अधिष्ठात्री देवी मायावती यांनीं विजयी सेनानायकाचा जयजयकार या पूर्वींच केलेला आहे. मग आतां आणखी कोणती नवीन भाग्याची गोष्ट घडून आली आहे ?

**मायावतीः**—आजच्या दरबारसाठीं—कुणाची स्वारी मुद्दाम आली आहे?

**सेनापतिः**—कुणाची ?

**मायावतीः**—राजभगिनी कमलादेवी ताईसाहेबांची !

**सेनानायकः**—अंतःकरणाच्या खोल जखमेला देवी मायावतीनीं असं दुखवावं ?

**मायावतीः**—हं, हं, सेनानायक, भाग्य आपल्यापायीं चालत आलं,

तरी त्याला अभाग्यच समजावं ? फुलण्यापूर्वी गुलाबाला नुसते कांटेच होते, म्हणून फुलल्यावर कांट्याकडेच बघावं ? युद्धापूर्वींच्या साध्या सेनापतींना झिटकारून कड्याकपाटांत जाऊन बसणाऱ्या ताईसाहेब आज त्यांच्या जयजयकाराच्या प्रसंगीं मुद्दाम आल्या आहेत, हें कशाचं लक्षणं ? बायकां-च्या हृदयाचा कांटेरी गुलाब पराक्रमाच्या आणि वैभवाच्या वसंतानं तेव्हांच फुलतो बरं !

**सेनानायक**:—खरं का हें ?

**मायावती**:—एक स्त्रीहृदयच आपल्यापुढं साक्ष देत आहे. अगबाई, अमात्यांची स्वारी आली वाटतं. बरोबर पुरोहितही आहेत. सेनापतींचा हा गुलाबी विजय महायुद्धांतील विजयालाही आपल्या मोहक गंधानं भारून टाकील. गुलाब असाच फुलता राहून त्याची माला लवकरच सेनानायकांच्या कंठांत पडेल बरं !

[ मुजरा करून जाते. **अमात्य, पुरोहित, हेराध्यक्ष** येतात.

**अमात्य**:—हेराध्यक्ष, तुमचं वर्तमान समजलं. दक्षता राखा, जा.

[ **हेराध्यक्ष** मुजरा करून जातो. **कोतवाल** येतो.

**कोतवाल**:—( मुजरा करून ) अमात्यांचा जयजयकार असो ! ठिक-ठिकाणाहून जासूद आले असून, अमात्यांच्या आज्ञेप्रमाणं सर्वत्र राजाज्ञेचा पुकारा झाला असल्याचं चरणापाशीं निवेदन करीत आहेत.

**अमात्य**:—कांहीं विशेष वर्तमान ?

**कोतवाल**:—सम्राटांच्या प्रतापामुळं सर्वत्र शांतता आहे.

**अमात्य**:—दीनदास आणि त्यांचे लोक यांच्यामध्यें कांहीं चलबिचल ?

**कोतवाल**:—सम्राटांच्या प्रतापापुढं कोण चलबिचल करणार आहे ? अमात्यांच्या आज्ञेप्रमाणं सभागृहांत त्यांना मागील प्रवेशद्वारानं सोडण्या-विषयीं द्वाररक्षकांना सांगितलं आहे.

**अमात्य**:—ठीक आहे. सम्राटांच्या आगमनाची वेळ जवळ येत चालली. राजमार्गावरील व्यवस्था दक्षतेनं राखा आणि सम्राटांची स्वारी शिबिरांतून निघाली, कीं इकडं वर्दी द्या. ( 'आज्ञा' म्हणून मुजरा करून जातो.) पुरोहित, दरबारच्या मुहूर्ताला अजून किती अवकाश आहे ?

**पुरोहित**:—सुमारें दीड एक घटकेचा अवसर आहे.

**सेनानायकः**—( पुढें येऊन ) अमात्यांचा जयजयकार असो !

**अमात्यः**—विजयी सेनानायकांचा सदा विजय असो !

**सेनानायकः**—अमात्य, आपण आम्हां सरदारमंडळाचे अग्रणी आणि या साम्राज्याचे कर्णधार आहांत. आपण कराल तें आम्हांला मान्यच आहे. तरी पण या प्रसंगीं बोलल्यावांचून राहवत नाहीं.

**अमात्यः**—बोला, खुशाल बोला. संकोच कां ?

**सेनानायकः**—दीनदासाचे लोक मुद्दाम आज जमावानं आले असतां आपण त्यांचा दरबारांत प्रवेश होऊं दिलात ?

**अमात्यः**—ज्यांनीं ऐन वेळीं युद्धांत अमोल कामगिरी बजावली, त्यांना दरबारला प्रतिबंध करावा म्हणतां ?

**सेनानायकः**—अमोल कामगिरी ! यांचीं पथकंच मुळीं युद्धांत घ्यायला नको होतीं.

**अमात्यः**—आतां युद्ध होऊन गेलं आहे, आपणाला विजय मिळाला आहे; पण युद्धाच्या ऐन निकराच्या वेळीं आपल्या क्षत्रिय कुलांचा कल्पनातीत संहार होऊन, जरा आणीबाणीचें प्रसंग—

**सेनानायकः**—युद्धांतील संहारानं क्षत्रिय कधींही डगमगत नसतात ! संहार झाला म्हणून आमची प्रतिष्ठा नाहींशी झाली काय ? आम्हीं आमच्या प्रतिष्ठेच्या जोरावर आमचे सैनिक निर्माण केले असते. त्यासाठीं आम्हाला या दीनदासासारख्या क्षुद्र लोकांच्या साहाय्याची कांहीं जरूरी नव्हती.

**अमात्यः**—युद्धापासून सर्वथा अलिप्त राहण्याविषयीं विश्वानंदस्वामींनीं युद्धाच्या आरंभीं जी विचित्र शिकवणूक सुरू केली होती, तिचा परिणाम लोकांच्या मनावर किती झालेला होता, याची नीटशी कल्पना आमच्या सेनापतींना नाहींशी दिसते. भाग्य आमचं, कीं खुद्द त्यांच्या पुत्रानंच त्यांच्या सांप्रदायाविरुद्ध जाऊन स्वतां सैन्य तयार करण्याचे कामीं पुढाकार घेतला.

**सेनानायकः**—अमात्य, आपणच आपल्या मुखानं आपली अशी विडंबना कां करून घेतां ? ज्या लोकांची सेवा मनास येईल तेव्हां मानेवर जोकड ठेवून हक्कानं घ्यायची, त्यांची ती सेवा म्हणजे महद्भाग्यानं लाभलेला कृपाप्रसाद असं आम्हां क्षत्रियांना वाटूं लागलं, म्हणजे आमच्या मनो-

दौर्बल्याची परमावधि होऊन, आमचं विडंबन आम्हींच केल्यासारखं होत नाहीं काय ?

**पुरोहितः**—छेः, छेः, क्षात्रतेजाचं असं विडंबन ? अहो, शापादपि शरादपि अशा आमच्या ब्राह्मतेजालाही क्षात्रतेज पुरून उरलेलं आहे ! ज्या तेजानं एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली, त्याच ब्राह्मतेजाला अखेरीस भीष्मासारख्या क्षत्रियापुढं हार खावी लागली !

**सेनानायकः**—या लोकांना अशा रीतीनं महत्त्व दिल्यामुळं त्यांचं प्रस्थ दिवसेंदिवस वाढत चाललं आहे. तें कमी करण्यासाठीं प्रथम त्यांना निःशस्त्र करणं अवश्य असून त्याला ही शांततेच्या दरबारची संधि उत्तम होती. पण आपण त्यांचा इथं प्रवेश होऊं दिल्यानं, महाराजांशीं समक्ष दाद मागण्याची, त्यांनाच ही एक उत्कृष्ट संधि आपण होऊन देत आहोंत.

**अमात्यः**—सेनापतिसाहेब, त्यांनीं साम्राज्याशीं आजपर्यंत कधींही द्रोहाचं वर्तन केलेलें नाहीं. उलट आणीबाणीच्या वेळीं निष्ठापूर्वक सहाय्यच केलेलं आहे. ते दरबारला येत असतां त्यांचा प्रवेश होऊं न देणं हें गैर-मुत्सद्दीपणाचं झालं असतं. ज्या महाराजांची त्यांनीं ऐन वेळीं निष्ठापूर्वक उल्हासानं सेवा केली, त्यांचे चरणापाशीं केव्हांही दाद मागण्याचा त्यांना अधिकार आहे. त्यांना निःशस्त्र करणं किंवा न करणं ही गोष्ट फार नाजूक असून तिचा निर्णय सम्राटांनींच केला पाहिजे. सेनापतिसाहेब, आपण युद्धांत मिळविलेला विजय इतका अपूर्व आणि थोर आहे कीं, आपणां-सारख्यांना या सामान्य गोष्टींचा अशा आनंदाच्या वेळीं यत्किंचितही हेवा वाटूं नये. [ तोफ होते.

**कोतवालः**—( प्रवेश करून ) सम्राटांची स्वारी आपल्या शिबिरांतून निघाल्याची ही तोफ झाली.

**अमात्यः**—चला सेनापतीसाहेब. पुरोहित, चला. सम्राटांना सामोरें जाण्यासाठीं आपण आतां महाद्वारावर जाऊं. [ सर्व जातात.

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळः**—विजयस्तंभ. चबुतऱ्याच्या दर्शनीभागावर सुवर्णपट. पायथ्याशीं दरबारची मांडणी. सिंहासनाचे मागील बाजूस सज्जावर **कमलादेवी** आदिकरून स्त्रिया. एका बाजूस सरदारमंडळ व त्यांचे मागें सैनिक. दुसरे बाजूस सामंतमंडळ. मागें नागरिक प्रजाजन. त्यांतच **दीनदास, मोतीराम** आदिकरून लोक. **अमात्य, सेनापति, पुरोहित** महाद्वाराशीं उभे आहेत.

[ पडद्यांत भेरी आदिकरून वाद्यें वाजतात. नंतर ललकारणी होते.]

**जयजयकार महाराज ।**

**भारतवर्षाधिपति । राजराजेश्वर । सामंत-मंडळाधिष्ठित ।**

**सकलगुणनिधान । श्रीमान् । धीमान् । सम्राट् कुमारसिंहमहाराज ।**

**जयजयकार महाराज ।**

[ **सम्राट् कुमारसिंह** कनकवेत्रधारीयांसह प्रवेश करतात. सर्व उत्थापन देऊन मुजरे करतात. **अमात्य** सम्राटांना हातानें धरून सिंहासनावर बसवितात. पुन्हा मुजरे होतात. सर्व स्थानापन्न होतात.]

**खुषमस्कऱ्याः**—(प्रवेश करीत असतां ललकारणीचे सुरांत) ॐ शांतिः! शांतिः!! शांतिः!!!

**सेनानायकः**—महाराजांचे खुषमस्करे आजच्या शांततेच्या दरबारची प्रतिष्ठा जाणतच आहेत.

**खुषमस्कऱ्याः**—बरोबर ओळखलंत बोवा! म्हटलं हे शांतिपाठाचे बोल नीट वठतात कीं नाहीं कोण जाणे. का हो सेनापतिसाहेब, रणवाद्यांत देखील हेच बोल बसविले तर?

**अमात्यः**—सम्राटांनीं आतां आजच्या दरबारच्या कार्याला प्रारंभ करावा.

[ वाद्यें वाजतात

**कुमारसिंहः**—(वाद्यें थांबल्यावर) आमचे सर्व मांडलिक सामंतहो, अमात्यादि मंत्रिमंडळ, सेनापति आदि सरदारमंडळ व अखिल प्रजाजनहो! प्रतिभारतीयुद्धच अशा गेल्या महायुद्धांत आम्हांला मिळालेल्या

अपूर्व विजयाचा हा आजचा महोत्सव आहे. सर्वांना विदितच आहे, की हें युद्ध आमच्या सीमान्त प्रदेशाचा हा जो निकटवर्ती भाग, त्यांतील सभोंवारचे आमचे शत्रु वारंवार जगताची शांतता भंग करीत, त्यामुळं केवळ निरुपायानं आम्हाला करावं लागलं. सत्याचा वाली परमेश्वर असल्या-मुळंच त्यानं आम्हांला या युद्धांत अपूर्व यश देऊन जगतांत शांततेचं साम्राज्य स्थापन करण्याचं श्रेय दिलेलं आहे. ते शांततेचं साम्राज्य पूर्णपणं प्रस्थापित झालं, असं जगाला जाहीर करण्यासाठीं म्हणून मुद्दाम आजचा हा दरबार आम्हीं भरवला असून या ठिकाणीं शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा करण्याचं आम्हीं योजिलं आहे. ज्याच्या पराक्रमपूर्ण नेतृत्वामुळं आम्हांला युद्धांत अपूर्व विजय मिळून आजचा हा सुयोग प्राप्त झाला, त्या विजयी सेनानायकांनाच ह्या प्राणप्रतिष्ठा करण्याचा बहुमान देणं आम्हांला योग्य वाटतं. आणि म्हणून आमचे प्रतिनिधि या नात्यानं हें कार्य करण्याची आम्हीं त्यांस आज्ञा करीत आहोंत. विजयी सेनानायक, आतां आपल्या कार्याला प्रारंभ करावा.

**सेनानायकः**—( उठून व मुजरा करून ) भारतवर्षाधिपति राजाधि-राज सम्राट् कुमारसिंह यांच्या पुण्याईच्या प्रभावानं गेल्या महायुद्धांत आमच्या शत्रूंचा पूर्ण विध्वंस झालेला आहे. त्या युद्धांत भारतवर्षाच्या क्षात्रतेजाचं अपूर्व दर्शन भाग्यशाली भारतीयांना याच स्थानीं घडलं. आणि त्यामुळं हें स्थान त्यांच्या दृष्टीनं अति पवित्र असं पुण्यक्षेत्र होऊन बसलं आहे. सामंतादि सभाजनहो, लक्षांत ठेवा, कीं आपण सुखासनावर बसून ज्या ठिकाणीं सांप्रत शांतिसौख्याचा उपभोग घेत आहांत, तें स्थान एकेकाळीं प्रचंड युद्धाच्या रणधुमाळीनं सारखं दुमदुमून गेलेलं एक रण-क्षेत्र होतं. याच क्षेत्रीं आमच्या हजारों क्षत्रिय वीरांनीं आत्मयज्ञ करून आपणाला ही शांति प्राप्त करून दिलेली आहे. या धारातीर्थीं त्या वीरानीं हे यज्ञ केल्यामुळं त्यांना स्वर्गप्राप्ति झाली. शांतिदेवीची प्राणप्रतिष्ठा करायला हें धारातीर्थच सर्वथा योग्य, असं आपणाला वाटत नाहीं काय ?

**खुषमस्कऱ्याः**—अलबत् ! धन्य धन्य, शांतिदेवी ! धारातीर्थीं स्वर्गवास घडतो ! तुझ्या प्राणांची इथं प्रतिष्ठा होऊन तुला आतां स्वर्गवास होणार !

**सेनानायकः**—आम्हां क्षत्रियवीरांच्या प्राणाहुति देण्याची ही पवित्र

यज्ञभूमि म्हणून हें स्थान शांतिदेवीची प्राणप्रतिष्ठा करायला योग्य, हें तर खरंच. पण या स्थानाला आणखीही एका दृष्टीनं फार महत्त्व आहे. आपल्या नीच आणि उच्छृंखल महत्त्वाकांक्षेनं शांतिदेवीचा नेहमीं उच्छेद करूं पाहणारे भारतवर्षाचे दुष्ट घातकी शत्रु प्रायः याच निकटवर्ति प्रदेशांतून आमच्यावर चाल करून येत असतात. त्यांच्याशीं झुंज देऊन त्यांची रग जिरवायला सर्वतोपरी योग्य असं जर कोणतं स्थान असेल, तर तें हेंच होय. जगांतील सर्व लोकांचा या स्थानावर फार डोळा आहे. कां कीं, हें स्थान म्हणजे भारतवर्षाचं केवळ नाक होय !

**खुपमस्कऱ्याः**—तर मग सेनानायक, त्या नाकांत या गरीब खुप-मस्कऱ्याची तपकिरीची डबी सांपडते का बघा हो.

**सेनानायकः**—खुपमस्करेमहाराज, सम्राटांच्या अंतःपुरांतील हा खाजगी दरबार नव्हे !

**कुमारसिंहः**—आनंदा ! तुला हा दरबार मना आहे ! आपल्या शिबिरांत जा.

**खुपमस्कऱ्याः**—सम्राटांची आज्ञा प्रमाण. सेनानायक, माझी या दर-बारांतून हकालपट्टी झाली. पण सांगतों, माझी तपकिरीची डबी धुंडाळा, नाहीं तर या तुमच्या भारतवर्षाच्या नाकाला अशी सडकून शिंक येईल कीं, त्या-मुळं इथून या दरबारचीही हाकालपट्टी होईल !

[ **सम्राटांना** मुजरा करून जातो.

**सेनानायकः**—असं हें महत्त्वपरिपूर्ण अत्यंत स्पृहणीय स्थान इतके दिवस आमच्या निकटवर्ति शत्रूंच्या ताब्यांत होतं. त्यामुळं पलीकडील देश आमचे मित्र असूनही आम्हाला जगाची शांतता राखणं दुर्घट झालं होतं. म्हणून सम्राटांनीं एका प्रचंड रणयज्ञांत या ठिकाणीं आपल्या असंख्यात् वीरांच्या आहुति टाकून हें स्थान त्या यज्ञाचं फळ म्हणून प्राप्त करून घेतलं आहे. आणि जगाच्या शांततेचं अधिष्ठान म्हणून हा प्रचंड विजयस्तंभ या स्थानीं उभारला असून, तिथंच आतां शांततादेवीची सु-मुहूर्तावर प्राणप्रतिष्ठा व्हायची आहे. पण त्यापूर्वीं हें अधिष्ठान अढळ व्हावं म्हणून त्याचेभोंवतीं साम्राटांच्या प्रभावाचं मंडळ प्रस्थापित करावं, असं हे आमचे मित्र राजे इथं मंडलाकार बसले आहेत, त्यांस अवश्य वाटत आहे.

म्हणून ते स्वतां त्या मंडलांतील मांडलिक होऊन, प्रभावनिदर्शक अशी महामंडलेश्वर ही पदवी सम्राटांना आतां समर्पण करतील.

**सामंतराजः**—( उठून मुजरा करून ) पूर्ण मंडलयुक्त चंद्रमा प्राणिमात्रांचीं अंतःकरणं प्रसन्न करीत असतो. तद्वतच शांततेनं सर्वांचीं अतःकरणं प्रसन्न व्हावींत एवढ्यासाठीं आम्ही सर्व राजे सम्राटांना पूर्णमंडलयुक्त करून तन्निदर्शक महामंडलेश्वर ही पदवी अभियुक्त वस्त्रांभरणांसहित अर्पण करीत आहोंत. [ जयजयकार व वाद्यगजर.

**सेनानायकः**—राजसत्ता त्रिरूपाशक्तीनं युक्त असावी लागते. सम्राट् महामंडलेश्वर झाल्यानं त्यांची प्रभावरूपा शक्ति आतां पूर्ण प्रस्थापित झाली आहे. अमात्यांसारखे मंत्रिजन जावत्काल आहेत, तावत्काल त्यांच्या मंत्रशक्तीकडं वांकडया नजरेनं पाहाण्याची कुणाचीच प्राज्ञा नाहीं. आणि ज्यांनीं आपल्या अतुल पराक्रमानं हा अपूर्व विजय संपादन केला आहे, त्या आम्हां सरदारांच्या क्षत्रिय मंडलानं सम्राटांची विक्रमशक्ति जगाच्या निदर्शनास आणून दिलेली आहे. पण ही विक्रमशक्ति निरंतर उद्यतदंड असेल तरच राजे लोकांना जगाची शांतता अखंड राखतां येणं शक्य होतं.

**दीनदासः**—( मध्येंच उठून ) म्हणूनच महामंडलेश्वरांच्या चरणापाशीं स्वामिकार्यतत्पर आणि एकनिष्ठ प्रजाजनांची याच प्रसंगीं एक नम्रतापूर्वक प्रार्थना आहे—थांबा सेनानायक, क्षमा करा.—प्रजेची प्रार्थना आपल्या कार्याला पुष्टि देणारी नसती, तर आपणाला मीं असा विच्छेद करण्याचं धाडस केलंच नसतं.

**कुमारसिंहः**—बोला बोला, आमच्या प्रजेची काय प्रार्थना आहे ?

**दीनदासः**—महामंडलेश्वरांचा निरंतर विजय असो ! सम्राट्, आपली विक्रमशक्ति निरंतर उद्यतदंड असेल, तरच जगताची शांतता अखंड राखतां येणं शक्य आहे, असं आतांच आमच्या विजयी सेनानायकांनीं सांगितलं. मग सम्राटांच्या सामान्य प्रजाजनांची गेल्या युद्धांत प्रकट झालेली विक्रमशक्ति स्वामिकार्याला निरंतर तत्पर असतांना, तिला निःशस्त्र, निर्गतदंड आणि म्हणून दुर्बळ करून टाकण्याचे प्रयत्न कां करण्यांत येत आहेत ?

**अमात्यः**—( सेनापतींना आंवरून ) स्वामिकार्यतत्पर प्रजाजनांचा

सम्राट् निरुत्साह करतील, असं तुम्हांसारख्या लोकांना वाटतं, ही तुमचीच चूक आहे. आमचे सम्राट् प्रजावत्सल आहेत.

**सेनानायकः**—होय, सम्राट् प्रजावत्सल आहेत, म्हणून प्रजेच्या रक्षणाची काळजी वाहणं हें ते आपलं आदिकर्तव्य मानतात. आपल्या राज्यांत पापशक्ति ते कधींही निर्माण होऊं देणार नाहींत. शांतताभंग करणाऱ्या बाहेरच्या शत्रूंचा जसा त्यांनीं निःपात केला, तसा अंतःशत्रूंचाही—

**मोतीरामः**—( एकदम उठून ) काय, आम्ही अंतःशत्रु? कोणाचे अंतःशत्रु? आमचे आम्ही अंतःशत्रु?

**दीनदासः**—मोतीराम!

**मोतीरामः**—आम्ही अंतःशत्रु? गेल्या युद्धांत ऐन संकटाचे वेळीं सम्राटांची आज्ञा होतांच आपले कृषिकर्मादि व्यापार टाकून देऊन, साम्राज्याच्या रक्षणासाठीं सेनानायकांच्या बरोबर आपलं रक्त वेचलं, ते आम्ही अंतःशत्रु?

**सेनानायकः**—कोतवाल, दरबारची प्रतिष्ठा आणि शांतता भंग करणाऱ्या या सर्व लोकांना एकदम सभागृहाच्या बाहेर काढून लावा.

**मोतीरामः**—कोण, आम्ही शांतताभंग करणारे? ज्यांचे कृषिकर्मादि व्यापार केवळ शांततेच्या कृपेनंच चालणार, असे आम्ही, शांततेकरितां तळमळणारे सम्राटांचे कृषिवल शांततेचा भंग करणारे?

**दीनदासः**—होय मोतीराम,तुम्हीच या वेळीं शांततेचा भंग करीत आहांत.

**मोतीरामः**—चितेंत सांपडलेलीं प्रेतं असतील तीं अशा वेळीं शांत राहतील.

**दीनदासः**—प्रत्यक्ष सम्राटांचं आपल्याला दर्शन घडलेलं असून आपली प्रार्थना त्यांच्या चरणापाशीं आहे.

**कुमारसिंहः**—प्रजाजनांची प्रार्थना आम्हीं ऐकलेली आहे. आणि अमात्यांनीं आश्वासन दिल्याप्रमाणं आम्ही तिचा अवश्य विचारही करूं. मात्र अधीरपणानं कोणीही या वेळीं आजच्या महोत्सवाचा विरस करूं नये. सर्वांनीं शांत आणि प्रसन्न चित्तानं आपापल्या स्थानीं स्वस्थ असावं. सेनानायक, आपलं नियोजित कार्य पुढं चालू करा.

**सेनानायकः**—सम्राटांची विक्रमशक्ति उद्यतदंड रहावी म्हणून क्षत्रियांचं जें सरदारमंडळ, त्यांचे अभेद्य दुर्ग या विजयस्तंभाभोंवतीं मंडलाकार यापुढं उभारण्याचं सम्राटांनीं ठरविलं आहे. हा विजयस्तंभ म्हणजे शांततादेवीचं मंदीर आणि दुर्गस्थ सरदार हे त्या देवतेची उपासना अखंड चालू ठेवणारे पुरोहित होत. या मंदिराच्या गगनभेदी शिखरावर गतिमान् सूर्यानंही आपल्या रथाची गति क्षणभर शांत करून, शांततादेवीचा मान राखण्यासाठीं आपलं प्रभायुक्त सितछत्र तिच्यावर धरलं पाहिजे! तोच मुहूर्त आतां प्राप्त झालेला आहे. याच सुमुहूर्तावर शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा व्हावयाची आहे. सम्राटांच्या सिंहासनासन्निध स्तंभाच्या चबुत्र्यावर सोडलेला तो सुवर्णपट—त्या पटाकडं आतां आपणां सर्वांचं अवधान असूं द्या. तिथं एका शोभिवंत देवायतनांत विश्वकर्म्याच्या कौशल्यालाही लाजवील, अशी शांततादेवीची प्रतिमा घडवून बसविलेली आहे. सम्राट् आपल्या हातांनीं हा पट आतां बाजूला करतील, त्यावेळीं ती प्रतिमा आपल्या अदृष्टपूर्व स्वरूपानं सर्वांना स्तंभित करून सोडील. लक्षांत ठेवा, कीं ती प्रतिमा आम्हां क्षत्रियांच्या पराक्रमाची केवळ अवतारमूर्ति—(झट्कन् पडदा बाजूला सारून कृष्णवस्त्र परिधान केलेली वीरनवाली प्रगट होते.)

**वीरनवालीः**—वीर–न्–वाली! वीर–न्–वाली!
कोठें गेला, वीर–न्–वाली?

[सर्व स्तंभित होऊन भयचकित मुद्रेनें पहातात.]

**सेनानायकः**—(स्वगत) ही इथं? मारूं का?—पण हें काय? तिच्या मारलेल्या नवऱ्याचा, कालियाडोहांत कंठस्नान घालून बुडवलेल्या त्या वीरबाहूचा चेहरा? (उघड) ही चामुंडा कशी इथं ऐन वेळीं अपशकून करायला आली? ही कुठून आली? हिला कुणीं आणली? कोतवाल? या चामुंडेची एका घावासरशी इथं मुंडी उडवून शांततादेवीच्या प्राणप्रतिष्ठेचा पहिला बळी—

**कमलाः**—(एकदम पुढें येऊन) तो पहिला बळी या राजभगिनीचा पडेल आणि मग या हतदैवी स्त्रीचा पडेल!

**कुमारसिंहः**—कोण, ताई?

**राजा**...?

**वीरनवाली**—( कमलादेवीला एकीकडे सारून एकदम सेनापतीच्या समोर जाऊन व त्याचेकडे बोट करून—)

कोठें गेला । वीर–न्–वाली ?
कालिजा माझा । वीर–न्–वाली !
( सभेकडे तोंड करून )
नाहींना मज । कोणिच वाली ?
त्रिखंड हिंडे, वीरनवाली
जनांत एकलि, वीरनवाली
वनांत एकलि, वीरनवाली
नाहीं ना मज कोणिच वाली ?
वीर–न्–वाली ! वीर–न्–वाली !

[ असें म्हणत म्हणत निघून जाते. सर्वजण मागे सरून तिला वाट देतात.]

**मोतीराम**ः—ऐका, ऐका, महामंडलेश्वर ऐका ! लोकहो, ऐका ! वीरनवालीच्या मुखानं हा आपल्या भारतवर्षाच्या भूमातेचा हंबरडा ऐका ! तिला कोणीच वाली नाहीं काय ?

[ सभाजनांतून एका मागून एक आवाज येतात. 'नाहीं कसें ? आम्ही वाली आहोंत' 'आम्ही आहोंत' 'आम्ही आहोंत' ]

**सेनानायक**ः—( क्रोधानें पाय आपटून ) काय, हा दरबार नसून माथेफिरू बुणग्यांचा बाजार आहे काय ? सर्व जगाला नुसत्या कल्पनेनं चळचळां कांपायला लावणारं, ठिणगीसरसं सर्वांचा भडका उडवून देणारं आम्हां सरदारमंडळांत एकवटलेलं सम्राटांचं क्षात्रतेज इथ समोर असतां तुम्ही दंगा माजवतां ? सैनिक हो ! या बाजारबुणग्यांचीं फिरलेलीं माथीं बाणांच्या अग्रांनीं एकदम अंतराळांत न्या. म्हणजे तिथून खालीं पडून त्यांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होतील !

**दीनदास**ः—विजयी सेनानायक ! सागर खवळला, तरी तो आपल्या जलबिंदूंना ग्रासूं शकत नाहीं ! सम्राटांचं क्षात्रतेज सम्राटांच्याच प्रजेला जाळील काय ? आणि फिरलेल्या माथ्यांवर शस्त्र चालवणं वीरांना उचित आहे काय ?



वत्सलामाई ( रा. औंधकर ):—करुणासागर भाईराय ! करुणासागर भाईराय ! करुणासागर भाईराय ! ( पृ० ३५.)

**मोतीराम**:—चालवूंद्यात, चालवूंद्यात! मत्सरानं प्रजेलाच निःशस्त्र करूं पाहाणारे हे भागूबाई वीर आमच्यावर खुशाल शस्त्र चालवूंद्यात!

**सेनानायक**:—सैनिक हो पाहातां काय, चालवा बाण.

**मोतीराम**:—लोकहो, आपणाला निःशस्त्र करून आपली अप्रतिष्ठा करणारे हेच भागूबाई वीर! आपल्या स्त्रियांची वीरनवालीप्रमाणं विटंबना करणारे हेच नराधम! पाहतां काय?

[ इतक्यांत शुभ्रवस्त्र परिधान केलेली देवी वत्सलामाई एकदम येऊन लोकांकडे तोंड करून हात जोडून मध्यें उभी राहते.]

**वत्सलामाई**:—माझे भाईराय! शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा रक्ताच्या अभिषेकानं करूं नका!

**कमला व काकाजी**:—काय, देवी इथं?

**कुमारसिंह**:—काय, कमल! देवी शांतताच प्रगट झाली इथं!

**वत्सलामाई**:—कृपासागर भाईराय! ही तुमची गरीब माई तुमच्यापुढं पदर पसरून मागणं मागते. (सभाजनांत मोतीराम, 'काय माईजी!' असें उद्गारतांच 'माईजी!' 'माईजी!' 'माईजी!' असा सर्वत्र ध्वनि निघतो.)

**मोतीराम**:—भाईहो! माईजींची आज्ञा! आपलीं शस्त्रं आंवरा!

**वत्सलामाई**:—प्रेमसागर भाईराय! त्याबरोबरच आपला क्रोध आंवरा!

**मोतीराम**:—भाईहो! माईजींची आज्ञा प्रमाण! आपला क्रोध आंवरा!

**सेनानायक**:—(सैनिकांकडे क्रोधानें पाहून) अरे भ्याडांनो! असे मृत्पिंडासारखे 'आ' वासून उभे आहांत? तुमची कदर या घुंगुर्ट्यांनासुद्धां वाटत नाहीं, तें अगदीं योग्य आहे. तुमच्या क्षात्रतेजाची प्रतिष्ठा हीं घुंगुर्टी भरदरबारांत पायाखालीं तुडवीत आहेत, याची तुम्हांला कांहींच लज्जा वाटत नाहीं? अरे या ढोंगी लोकांच्या मैंदावाल्या भुलून तुम्ही मूढ बनलां आहांत! पाहतां काय, हा तुमचा सेनानायक तुम्हांला आज्ञा करीत आहे—एकदम बाण चालवा!

**वत्सलामाई**:—(सैनिकांकडे हात जोडून) करुणासागर भाईराय! करुणासागर भाईराय! करुणासागर भाईराय! (असें म्हणत मूर्च्छित पडते.

सैनिक स्तंभित होतात. एकीकडून कमलादेवी व दुसरीकडून दीनदास हे तिला सांवरतात.)

**कुमारसिंहः**—(एकदम पुढें येऊन) सैनिकहो ! बाण आंवरा ! सेनानायक, शांत व्हा ! अमात्य, दरबार बरखास्त करा ! दुबळ्या मानवी बुद्धीनं वर्तवलेलं काळाचं गणित चुकलेलं आहे ! शांततादेवीच्या महोत्सवाचा मुहूर्त अजून सांपडला नाहीं ! अस्वस्थ मनानं आम्ही शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा काय करणार ? या आमच्या प्रियभगिनी आम्हाला फारां दिवसांनीं भेटल्या आहेत. मनाची अस्वस्थता घालविण्यासाठीं त्या आम्हाला आपल्या संस्थानांत घेऊन जात आहेत. तिथं कांहीं काळ पूर्ण एकांतांत आम्ही विश्रांति-सुखाचा अनुभव घेणार आहोंत. आमचा म्हणून कोणत्याही प्रकारचा लवाजमा आमच्याबरोबर नको. आमची सर्व बरदास्त आमच्या ताईसाहेब ठेवतील. फक्त आमचा खुषमस्कऱ्या आनंदा आणि आमचे वृद्ध सेवक काकाजी यांनीं तेवढं आमच्याबरोबर असावं.

**खुषमस्कऱ्याः**—(प्रवेश करून) ॐ शांतिः ! शांतिः !! शांतिः !!!

[जातात. पडदा.

## अंक पहिला समाप्त

# अंक २ रा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळः—कमलादेवीचें संस्थान. मंदाकिनीच्या कांठचा वनप्रदेश. दोन वनरक्षक पूर्वेकडील आकाशाकडे पहात आहेत.]

**एक वनरक्षकः**—ह्यो सुगदेव न्हवं, ह्यो लेका बैलमाऱ्या ! अजून पारभर तरी रात असंल ! कोंबडसादबी न्हाई ! उगाच लेका माझी ख्वाप मोडलीस.

**दुसरा वनरक्षकः**—अजून कुटं मोडलीया ? बनराज येऊनश्यान जवा तिचं भलं प्येकॉट् मोडत्याल तवाच ती मोडंल. ल्योका, पेंगलेलं डोळं उघडूनश्यान वर माथ्यावर बघ ! त्यो ऽऽबैलमाऱ्या ! अन् ह्यो लेका सुगदेव ! कसा कमलावानी फुललाया ! चंद्रम मावलला तरीबी चांदनं हायेच !

[ पडद्यांत 'एऽसाद्या ऽऽऽ!' 'एऽ अर्ज्या ऽऽऽ!' अशा हांका ऐकूं येतात. आपापल्या नांवाप्रमाणें एक एकजण 'जी बनराज' करतो.]

**बनराजः**—( प्रवेश करून ) अन् तो धर्म्या कुटं हाये ?

**धर्म्याः**—( दुसऱ्या बाजूनें प्रवेश करून ) ह्यो हजर हाये जी बनराज !

**बनराजः**—लेकाचे पांडव वनवासाला आलेति जनु !

**साद्याः**—पन धुर्पदीच न्हाय ! त्येसाटीं तर हा अर्ज्या रातदीन या नंदीमंदी मासं मारीत असतो !

**बनराजः**—लेका, मासे मारून रे काय करणार ?

**साद्याः**—पान्यामंदी बगूनशान मासा मारला, तवाच अर्जुनाला धुर्पदी गवसली न्हवं का ?

**बनराजः**— गवासली, गवासली ! पन आज जर लेका या नंदीमंदी मासं मारलंस, तर धुर्पदी न्हाय, पन बदाबदी गवसंल !

**अर्ज्याः**—असं व्हं कां बनराज ?

**बनराजः**—अर आपल्या रानीसाब—

**तिघेः**—ताईसाब ? ताईसाब ? ताईसाब ?

**बनराजः**—व्हय. आपल्या ताईसाब ! लया दिसी आपल्या नगराकडं चालल्याती. बरूबर पावनं हायती. कोन म्हून न्हायी इचारलंत ?

**तिघेः**—कोन ? कोन ? कोन ?

**बनराजः**—चूप ! अरे ल्येको मोटयानं बोलूं नका. त्येंचं बंदूराज ! समद्या-समद्या-पिरथमीचं मोट्टं-मोट्टं-मोट्टं म्हाराज !!!

**तिघेः**—व्हय ? व्हय ? व्हय ?

**बनराजः**—हं ! बिगिबिगि ! ताकीद हाय, कीं आतां नाचंमंदी येऊनशान हत्तं उतारत्याल, अन् बनसंचार करत, रमत रमत नगराकडं जात्याल. काल रातपून समदीकडं ताकिदी गेल्या हैती. कोंबड्याची पयली साद व्हईल. तवापून कुनीबी या रानामंदी फिरकतां कामा न्हई. म्हून सांगतों, गोवाऱ्याचीं खिल्लारं, धनगराचीं मेंढरं, शेणाऱ्याचीं पोरंसोरं समदी समदी पिटाळून लावा.यवड्या यवड्या टापूंत एक चिट्पांखरूं बी न्हाता कामा न्हाई !

**खुषमस्कऱ्याः**—( प्रवेश करीत ) आपण यांपैकीं कुणी नाहीं रेब्बाप्पा ना खिल्लार, ना पोरसोर ! ना मेंढरूं, ना चिट्पाखरूं !

**काकाजीः**—( प्रवेश करून ) आम्ही राणीसाहेबांची पाव्हणे मंडळी-महाराजांचे पुढें आलेले सेवक आहोंत. आणि बनराज, राणीसाहेबांची ताकीद तुमच्या हातांतल्या या तिरकामठ्याप्रमाणं हवी तशी ताणूं नका.

**खुषमस्कऱ्याः**—नाहीं तर असल्या ह्या तिरंदाजीनं रावण तर काय ! पण वनांतला रामसुद्धां नाहींसा होईल ! राम आहे, तरच वनांत गोडी ! रामाच्या वनवासांतच जगाचा उल्हास आहे ! वनांतल्या शिळांना दिव्य कळा कशामुळं येते ?

**बनराजः**—पहाटंच्या रामपारीं किती गोडगोड बोललांत दादासाब ! या रामपारचा या बनराजाचा रामराम घ्यावा.

**काकाजीः**—कोणी नागरीक, पुरवासी किंवा दरबारी दिसला, तर त्याला मात्र कोणत्याही निमित्तानं इकडं फिरकूं देऊं नका.

**बनराजः**—आज्ञा परमान,दादासाब. चलारं ! समद्या रानसीमा रोखूनशान धरा. आन् कुनी बी नागरीक, पुरवासी, दरबारी गवसला, तर त्येला पकडूनशान हत्तं घेऊन या. रामराम. [ बनराज व रक्षक जातात. ]

**खुषमस्कऱ्याः**—रामराम रामराम ! काय आजच्या या रामप्रहराचा

आनंद वाटत आहे ! काकाजी, स्वामीजी अदृश्य झाल्यापासून इतके दिवसांत आज हा आनंदाचा रामप्रहर उजाडला असं वाटतं !

**काकाजी**:—आनंदा, तुझा स्वानंदसोहळा जगाला पटण्यासारखा नाहीं. कालच्या दरबारनं आम्हाला इतकं दडपून टाकलं आहे—

**खुषमस्कऱ्या**:—माझ्या तपकिरीच्या डबीला कां म्हणून दडपून टाकलं ? कशी सडकून शिंक आली भारतवर्षाच्या तुमच्या त्या नाकाला !

**काकाजी**:—अजून देखील आम्हांला सुखानं मोकळा श्वास टाकवत नाहीं. कालच्या विलक्षण देखाव्यानं भणाणलेलं मस्तक रात्रींच्या विश्रांति-नंतरही भणभणभण करीत आहे. एक तूं आणि महाराज ही अद्भुत जोडी मात्र कोणत्या स्वानंदाचा अनुभव घेत आहे, तें हरि जाणे ! सर्वांना चकित करून अभूतपूर्व प्रकारानं महाराजांनीं काल दरबार सोडला—

**खुषमस्कऱ्या**:—हो ! अवताराच्या गंगेचं पाणी कुठं तरी मुरत होतं, तें बाहेर पडलं !

**काकाजी**:—आनंदा, कांहीं तरी बोलून वाचाळपंचविशीनं चेष्टेवारी घालविण्यासारखी ही गोष्ट नव्हे. महाराजांनीं काल दरबार सोडला आणि ताईसाहेबांच्या या संस्थानांत पाऊल टाकलं मात्र, तेव्हांपासून महा-राजांची वृत्ति—

**खुषमस्कऱ्या**:—वारा प्यालेल्या वांसरासारखी झाली आहे, नाहीं ?

**काकाजी**:—आनंदा, तुझी गोष्ट वेगळी. पण महाराजांच्या महा-द्वाराशीं सबंध भारतवर्ष तिष्ठत उभं असतांना महाराज जर सुखस्वप्नांत दंग राहिले,—त्यांतून कालच्या दरबारचा देखावा पाहूनसुद्धां—

**खुषमस्कऱ्या**:—सांगतोंना गंगावतरणाची गोष्ट ! सहस्रावधि सगर-पुत्र भूमीच्या खोल गर्तेंत पडलेले ! गंगेनं त्यांना पावन करण्यासाठीं आकाशांतून एकदम पर्जन्यधारेप्रमाणं येऊन पडावं किं नाहीं ? आली ? हं हं ! केवळ पोटाला पावन करणारा पर्जन्य सरळ सरींनीं येतो. पण जगदोद्धाराची गंगा महातपस्व्याच्या जटेचे वळसे घेत-घेत-घेत-येते ! शिवाय—

**काकाजी**:—शिवाय काय ?

**खुषमस्कऱ्या**:—भगीरथ प्रयत्न !

[पडद्यांत महाराजांचा शब्द 'हूं चालूं द्या ! चालूं द्या'!
व नावाड्यांचा पुढील चकवा ऐकूं येतो.]

चकवा.

नाव घडीवलि गो च्येंदनाची ।
नाव घडीवलि गो च्येंदनाची।
सोन्याच्या बाळ्या । मोत्याच्या जाळ्या
घडीवलि गो च्येंदनाची ॥ नाव० ॥
रायाचं लगीन । मैनीचि केलवन । माल भरला सगीन ।
वल्ह्या वल्हव । घडीवलि गो च्येंदनाची। नाव ॥ १ ॥
वाईची मतूलय । पान्याचि वढ लय । माल भरला सगीन ।
वल्ह्या वल्हव । घडीवलि गो च्येंदनाची । नाव ॥ २ ॥
चंद्रम् भरती । नाव डुले वरती । माल भरला सगीन ।
वल्ह्या वल्हव । घडीवलि गो च्येंदनाची ॥ नाव० ॥
सोन्याच्या बाळ्या । मोत्याच्या जाळ्या । घडी० ॥ ३ ॥

[मंदाकिनींतून राजनौका आलेली दिसते. सम्राट् कुमारसिंह नौकेंतून उडी मारूनच उतरतात. कमलादेवी उतरून नावाड्यांस नौका नेण्यास सांगते.]

**कुमारसिंह**:—आनंदा, अरे कालपासून तूं आहेस कुठं ? इकडं येण्यांत आघाडी मारलीस होय ? पण मजा घालवलीस. अरे, खरी मजा आघाडींत नसते. आघाडीचा वीर स्वर्गाला जाईल, पण यशाला मुकेल. अरे, चांदण्या रात्रीचा नौकाविहार काय मजेदार झाला. पण तूं नव्हतास! आमच्या पाहुणचाराची यजमानीण—आमचं हें कमल—जरा कोमजल्या-सारखं दिसत होतं. जात चंद्रविकासी दिसत नाहीं. मग याचा सूर्य केव्हां उदय पावणार आहे कोण जाणे ! पावेल, पावेल ! कमल, पाहुण-चारानं प्रसन्न झालेल्या या बंधूच्या आशीर्वादानं उदय पावेल बरं !

**कमलादेवी**:—या गरीब बहिणीच्या पाहुणचारानं महाराजांना आनंद झाला, इतक्यानंच इला धन्यता वाटते.

**कुमारसिंह:**—हा आनंद गरीब बहिणीच्या महाराजांचा नव्हे ! कमलच्या कुमाराचा आहे ! महाराजांचा आनंद राजनीतीला धरुन शास्त्रोक्त असायला पाहिजे ! उंहुं, उंहुं, उंहुं. हा महाराजांचा आनंद नव्हे ! ( कोकिळा ओरडते) आहाहा! कु ऊऽ ! कु ऊ ऽऽऽ ! कु ऊऽऽऽऽ! कमल, इथं जर आतां महाराज असते तर त्यांना असल्या पाखरांचे शंभर खून करायला शास्त्रोक्त मुभा ! पण असा यांच्या सुराशीं सूर !—कु ऊऽऽ !

**खुषमस्कऱ्या:**—असल्या सुराशीं महाराजांनीं सूर मिळवायचा ? महाराजांचे शास्त्रोक्त गवई हंसतील कीं ? म्हणतील, कीं ही कोकिळा बेताल आहे ! स्वर पंचम असेल, पण आरोहाला धरून अवरोह नाहीं.

**कुमारसिंह:**—पण कुमाराला त्याची काय पर्वा ? तो म्हणणार 'कु ऊ ऽ ! कु ऊ ऽऽऽ ! बस्स्, यांतच बहार आहे. ! आनंदा, कु ऊ ऽ ! कु ऊ ऽऽऽ ! कु ऊ ऽऽऽऽ !

**खुषमस्कऱ्या:**—( टाळ्या पिटीत व नाचत )

कु ऊ ऽऽ टिव् टिव् किल् बिल् गुं गुं गुंजे भृंग।
कु ऊ ऽऽ टिव् टिव् किल् बिल् गुं गुं गुंजे भृंग।

प्रभातकाळचं हें तुळसीदासाचं पंछीबन् बोल रहे है !

**कुमारसिंह:**—पंछीबन् ! वाहवा ! हे वनाचे पंख प्रभातकाळीं असे फडफडायला लागले, कीं माणसाच्या मनाचे पंख अंतराळांत उडायला लागतात ! आनंदा, पक्ष्यांच्या पंखांहूनही भराऱ्या मारणारे, अंतराळाला भेदून थेट स्वर्गांत नेऊन पोचविणारे दिव्य पंख माणसाच्या मनाला खास आहेत; पण शरीराला नाहींतरे ! रात्रींचा अनुभव तुला सांगतों. या मंदाकिनीच्या झुलत्या पाण्यावर नावाड्यांच्या वल्ह्यांचे डोल घेत आमची नौका डुलत चालली होती. दूर वनराजींत कोठेंतरी एकटाच एक बुल्बुल् एकांताचे सूर काढीत होता. फार दिवसांनीं भेटलेल्या बहिणभावंडाच्या गुजगोष्टी चालतां चालतां आमचं हं कमल—पाण्यांतला जीव—पाण्यांतल्या पाळण्यांत तेव्हांच गुंग झाला ! पण पिंजऱ्यांतून मोकळं सुटलेलं हें पांखरूं, याला कुठली झोंप ? कुठं उडूं आणि किती भराऱ्या मारूं असं याला झालेलं ! खुमखुमी सुटलेल्या या पांखराच्या पंखांना असं

वाटलं, कीं खालीं वसुंधरेवर पडत असलेल्या चंद्रिकेच्या झोतांतून वर उलट गतीनं जाऊन चंद्रलोकांत तिचा उगम गांठावा. कल्पनेसरसा धाडकन् उठलों; पण काय, शरीराला पंख नाहींत रे! त्यावेळीं भराऱ्या मारणाऱ्या मनाला खालीं खेंचून आणणाऱ्या या शरीराचा भार इतका असह्य झाला—वाटलं कीं, एकदम याला मंदाकिनींत लोटून द्यावं! नावेच्या कांठाशीं गेलों—तों काय चमत्कार? जिथं बुडी घेणार, त्या मंदाकिनीच्या तळाशींच तो चंद्रलोक! आनंदा, माणसाच्या मनाचा उत्साह किती दांडगा रे? खालीं आलं, तरी निराशेच्या तळाशीं बुडी मारून तिथंसुद्धां आशेचा ठाव काढतं! तो ठाव काढण्यासाठीं कांठावरून बुडी घेणार—

**खुषमस्कऱ्याः**—घेतली असतीत तर भारतवर्षाऐवजीं बळीचं राज्य मिळालं असतं! मन स्वर्गांत, शरीर पाताळांत!

**कमलाः**—अगबाई, इडापिडा टळो आणि असलं हें बळीचं राज्य न मिळो! महाराज, खरंच कां आपण रात्रीं—

**कुमारसिंहः**—कोण, आमची ताईच बोलते का ही? कालच्या दरबारांत त्या वीरनबालीला पाठिशीं घालून भारतवर्षाच्या क्रुद्ध सेनापतीपुढं निर्भयतेनं उभी राहणारी आमची कमलादेवीच बोलते का ही?

**कमलाः**—भलत्या अविचारानं काय झालं असतं बरं? आपल्या ह्या दुबळ्या मानवीकुडीला कां कुठं चंद्रलोक गांठतां येणार आहे? मग मनाला तेवढं स्वैर सोडून शरीराची आणि मनाची ओढाताण कां करावी?

**काकाजीः**—अशानं मानवी जीविताची दुरवस्था होते. मृत्युलोकचा देहात्मयोग अशा ओढाताणीसाठीं नाहीं. तो वेगळा केला, तर कांहींच घडणार नाहीं. एकत्र असेल, तर उदंड पुरुषार्थ हातून घडून चंद्रलोकाचीच कथा काय, कीर्तीनं त्रैलोक्यांतही जातां येईल!

**कुमारसिंहः**—अरे, नंदनवनाऐवजीं चुकून तपोवनांत आलों कीं काय? इंगुदीच्या तेलानं चिकट झालेले जटाभार आणि तपानं सुरकुतलेले चेहरेच मला एकदम दिसायला लागले! अरे, तुम्ही तापशासारखे काय बोलायला लागलांत? मघाचे ते नावाडी कुठं गेले? त्यांचं तें चकव्याचं गाणं या तपोवनाचं पुन्हा नंदनवन करील! आनंदा, हे मनाला चकवणारे चकवे ज्यांनीं काढले असतील, त्यांच्यावरून राज्यंच्या राज्यं ओंवाळून



कुमारसिंह ( रा. दात ):—आई या कुमाराला बाळपणीं जसं खांद्यावर घेत-होतं, तसंच तें आताही घेतं ! (पृ० ४३.)

टाकावींत ! जीव कुरवंडी करावेत ! ( 'रायाचं लगीन' इ० कडवें म्हणतात. खुषमस्कऱ्या 'नांव घडीवलि गो' इ० पालुपद म्हणत टाळ्या वाजवून नाचतो.)

**कमलाः**—महाराज, महाराज, या बहिणीकरितां तरी —

**कुमारसिंहः**—बहिणीचा भाऊ कुमार ! महाराज कुठला ? ताई, वनांत मृगाप्रमाणं बागडणारीं, वानरांना वांकोल्या दाखवणारीं, कोकिळेला वेडावणारीं, उडत्या पक्षांच्या सावलीमागं धांवत जाणारीं कमल आणि कुमार विसरलीस काय ?

**काकाजीः**—पण तो बाळपणचा काळ.

**कुमारसिंहः**—त्यावेळीं काकाजी, तुमच्या खांद्यावर बसून आम्ही मोठे होत असूं नाहीं ? आनंदा, कुणी उंचीची बढाई मारायाला लागला, कीं काकाजींच्या खांद्यावर बसून आम्हीं त्याची खोड मोडलीच !

**खुषमस्कऱ्याः**—अलबत् ! गतकाळाच्या खांद्यावर बसून बसून तर माणसाची बालमूर्ति सर्वांत उंच झाली आहे ! पंखानं भराऱ्या मारीत जरीं नाहीं, तरी अशा रीतीनं त्याला चंद्रलोक गांठतां येणार नाहीं काय ?

**कुमारसिंहः**—शाबास आनंदा ! काकाजी गांठूं का चंद्रलोक ? ( त्यांचे खांद्यांवर चढूं लागतात.)

**काकाजीः**—महाराज ! महाराज !

**कुमारसिंहः**—महाराज ? महाराज दरबारांत, इथं कुठले महाराज ? कर्णानं आपलं कवच इंद्राला दिलं! वासुकीनं आपली कात विवरांत टाकली ! या कुमारानंही आपलं महाराजपण दरबारांत टाकलं ! मोकळा होऊन तो या वनांत कुमार म्हणून आला आहे.

**काकाजीः**—कर्णानं कवच दिलं, तरी कर्ण कांहीं कोळी झाला नाहीं ! वासुकीनं कात टाकली, तरी तो कांहीं किरडूं होत नाहीं !

**खुषमस्कऱ्याः**—पण सुरवंटानं कोश टाकला तर त्याचं तर फुलपांखरूं होतं !

**कुमारसिंहः**—मात ! मात ! काकाजी, आनंदानं तुमच्यावर मात केली ! सुरवंटानं कांटेरी कवच टाकून तो बागडणारं फुलपांखरूं झाला ! काकाजी, पहा हें फुलपांखरूं कसं झाडाच्या खांदीवर जाऊन बसलं ! (एका झाडाच्या खांदीवर एकदम उडी मारून बसतात.) झाड या कुमाराला बाळपणीं जसं खांद्यावर घेत होतं, तसंच तें आतांही घेतं.

तें नाहीं कुठं 'महाराज !' म्हणून काकाकुव्याच्या चकित मुद्रेनं आम्हाला दटावीत ? ( कानोसा घेऊन ) आनंदा, अरे हा कुठं तरी पांवा ऐकूं येत आहे ! कोकीळ, बुल्बुल्, चकोर, चंडोल या जशा झाडाझुडपांतून निघणाऱ्या अदृश्य वनदेवतांच्या लकेरी वाटतात, तसंच हा पांवाही दऱ्याखोऱ्यांतून निघणारा एकाद्या किन्नराचा सुस्वर आलाप वाटतो ! आनंदा, चल, आकाशांतील चंद्रलोक नाहीं तर नाहीं, पण हा भूमीवरचा आलाप तर गांठूं. या मोहक गूढाचा ठाव काढलाच पाहिजे. ( झाडावरून खालीं उतरतात.)

**खुषमस्कऱ्याः**—चला, विष्णुपदांतून मोकळी सुटलेली गंगा प्रथम शंकराच्या माथ्यावरील मोहक चंद्राचा ठाव काढण्यांतच गुंगली होती !

**कुमारसिंहः**– पण आनंदा, गंगेला आपला प्रवाह अनेकवेळां दुभंगावा लागला असेल नाहीं ? कारण जगांतील गूढ गोष्टी दिशाभूल करणाऱ्या असतात. त्यांची नेमकी दिशा एकदमच सांपडत नाहीं. पहा, हा पांव्याचा नादही कोणत्या दिशेला आहे, हें नेमकं सांगतां येत नाहीं. तेव्हां एकमेळीं एका दिशेनंच जाण्यापेक्षां आपण वेगवेगळया दिशा घेऊं. ज्याला प्रथम सुगावा लागेल, त्यानं खुणेची आरोळी द्यावी. चल, तूं त्या दिशेनं जा, आम्ही या दिशेनं जातों.

**खुषमस्कऱ्याः**—चला !                [ दोघे दोन दिशांनीं जातात.

**काकाजीः**—महाराजांची ही वृत्ति कोणत्या थरावर जाते, याची मोठी काळजी वाटूं लागली आहे.

**कमलाः**—काकाजी, अगोदर माईची काय अवस्था आहे, ती सांगा. काल दरबारांत तिला मूर्च्छा आली, पण महाराजांचा एकदम इकडं येण्याचा विचार ठरून ते तडक निघाले, त्यामुळं मला तिच्याकडं कांहींच पहातां आलं नाहीं.

**काकाजीः**—माईसंबंधानं आपण निष्काळजी असा. आनंदाच्या साहाय्यानं भाई दीनदासजी त्यांना घेऊन संजीवनालयाकडं गेले. त्या तिथं सुखरूप आहेत.

**कमलाः**—हें ऐकून जीव कितीतरी हलकावला. तिचं काय झालं न् काय नाहीं, याचा सारखा मला घोर लागून राहिला होता. पण ती दरबारांत ऐन वेळेला आली तरी कशी ?

**काकाजीः**—तें सारं आनंदाचं कृत्य ! [पडद्यांत—

" तूं दरबारी दिसतूयास! चल, आमच्या रानीसरकारकडं. तूं हतं कां आलास ? कुनाबी दरबाऱ्याला आज या बनामंदी येयाची बंदी हाय, तुला ठावं न्हई ? चल."

" अरे वेड्या, मला धरून नेण्याचं कारण नाहीं. तुझ्या हातांतला तो पांवा वाजव ! त्याच्या नादावर तूं नेशील तिकडं—गाईमागं वांसरूं—असा उड्या मारीत येतों, बघ ! आनंदा, अरे आनंदा !"

[ **बनराज, सम्राट् कुमारसिंह** यांस धरून घेऊन येतो.]

**बनराजः**—रामराम रानीसरकार ! ह्यो बनांत शिरलेला दरबारी चोर पकडूनशान आपल्या पायापं आनलाया बगा !

**कुमारसिंहः**—ताई, आज एका मोहक गूढाचा ठाव काढून बनांतला किनरीवाला किन्नर तुझ्याकडं घेऊन आलों आहें ! आनंदा ! अरे आनंदा !

**काकाजीः**—बनराज, तुम्हीं कुणाला पकडून आणलंत हें ?

**कमलाः**—हे तर आमचे बंधुराय कुमारसिंह महाराज !

**काकाजीः**—भारतवर्षाचे सम्राट् महामंडलेश्वर !

**बनराजः**—(भयभीत होऊन कमलादेवीच्या पायावर लोटांगण घालून) गुन्हेगार ! मायबाप्पा गुन्हेगार ! रानीसरकार, गुन्हेगार ! दया करा, चाकरींत गुन्हा घडला, जीवदान द्या. पायाचा चाकूर लाथाडूनशान दूर करूं नका.

**कुमारसिंहः**—अरे, तुझा मोहक सुरांचा पांवा वाजवायचा टाकून हे असे बदसूर रे काय काढायला लागलास ?

**कमलाः**—बनराज, उठा. गुन्हा चुकून घडला आहे, उठा. तुम्हाला क्षमा आहे.

**कुमारसिंहः**—हं, आतां तुझा पांवा वाजव पाहूं.

[ **खुषमस्कऱ्या, हेराध्यक्ष, छाया व अर्ज्या** येतात.]

**खुषमस्कऱ्याः**—या हेराध्यक्ष ! या पहा ताईसाहेब या इथं आहेत. ताईसाहेब, हे हेराध्यक्ष आपला शोध करीत होते !

**अर्ज्याः**—( कमलादेवीस मुजरा करून ) रानीसरकार, ह्यो बगा पांढरा दरबारी ! बगळ्यावानी नदीच्या कांठाशीं लव्हाळ्यामंदी उबा व्हता.

अन् त्येच्या मागं सावली परमान् ही काळी बया! ह्यो बगा, अगदीं बगळ्यावानी उगवत्या सूर्वेनारायनाकडं तोंड करूनशान उबा व्हता!

**खुषमस्कऱ्याः**—बगळा रे उगवत्या सूर्यनारायणाकडं तोंड करून कां उभा राहतो? ध्यान करतो कीं काय सूर्याचं?

**अज्याः**—न्हवं! आपली सावट पान्यामंदी माशाच्या नदरंस पडल म्हूनशान! बगळा वरून दादासाब, पांडरान सादा दिसतूया, पन् पोटा-मंदी काय हाये, ह्ये एक त्येलान् माशालाच ठावं!

**कुमारसिंहः**—काय हेराध्यक्ष, तुम्ही इकडं कुणीकडं?

**हेराध्यक्षः**—महामंडलेश्वर महाराजांचा जयजयकार असो! महाराज, या दासाला क्षमा असावी. ही माझी मामेबहीण देवी वत्सलामाईच्या संजीवनालयांत या (कमलादेवीकडे बोट दाखवून) किसनकुमारी ताई-साहेबांच्या तैनातींत असते. कालच्या दरबारचा समारंभ पाहाण्यासाठीं ताईसाहेबांच्या अनुमतीनं ती मुद्दाम आली होती. तिला मी परत पोंचवीत होतों, तों ताईसाहेब इकडंच असल्याचं कळलं, म्हणून इकडं घेऊन आलों.

**कमलाः**—बरं हेराध्यक्ष, मी आतां इकडे आल्यें, तेव्हां आतां या तुमच्या बहिणीला तसदी देण्याचं कारण नाहीं. छाये, आजपर्यंत तूं माझी सेवा मनोभावानं केलीस, हें घे तुला बक्षीस. हेराध्यक्ष, तुम्ही आपल्या या मामेबहिणीला चांगला मनाजोगता नवरा पाहून द्या बरं. लग्नाच्या वेळचा आहेर म्हणून ही थैली देत्यें, तिचा स्वीकार करा. या आतां. बनराज, यांना नीट आपल्या सीमेपर्यंत पोंचवा बरं!

**खुषमस्कऱ्याः**—अहो, अहो बाईसाहेब, आमच्या तेवढ्या तपकिरी-च्या डबीचा शोध, या तुमच्या हेराध्यक्षांकडून लावाना हो. मग आम्हीही तुमच्या नवऱ्याला या दरबारी कानांचा अहेर करूं कीं!

[ **बनराज, अज्या, हेराध्यक्ष, छाया** जातात.

**कुमारसिंहः**—ताई, देवी वत्सलामाईच्या संजीवनालयांत तूं होतीस?

**कमलाः**—होय कुमार. आपला दरबार सोडून मी इकडं आल्यें. तेव्हां-पासूनचा बहुतेक काल मीं माईच्या सहवासांत घालवला आहे.

**कुमारः**—किसनकुमारी या नांवान?

**कमलाः**—होय. या नांवानच मी तिथं राहिल्यें होतें. आपल्या

तिकडून आल्यानंतर माईच्या अनुमतीनं तिच्या संजीवनालयांत परिचारिका होऊन किसनकुमारी या टोपण नांवानं मी तिथं राहिल्यें. महाराज, या योगानं आपल्या भगिनीनं आपणाला कमीपणा आणला, असं तर आपणाला वाटत नाहीं ना ?

**कुमारसिंहः**—कमीपणा ? या कुमाराला असं वाटेल ? उलट हा कुमार तुझ्याबरोबर तिथला एक परिचारक बनून, तिथं यायला उत्सुक झाला आहे.

**वृषमस्कन्ध्याः**—काकाजी बोला ! परिचारिक महामंडलेश्वर महाराज-की जय !

**कुमारसिंहः**—ताई, चल. इथून एकदम तिकडंच प्रयाण करायचं.

**कमलाः**—महाराज, ही काय भलतीच लहर !

**कुमारसिंहः**—लहर ? ताई, ही लहर नव्हे—कांहींतरी अतर्क्य गूढ शक्तीची ओढ आहे ! देवी वत्सलामाई आणि तिचं संजीवनालय ! हे ध्वनि आजपर्यंत कितीवेळां तरी या सम्राटाच्या कानांवरून गेले असतील. पण अहर्निश कानांवरून जाणाऱ्या वाऱ्याच्या झुळकी काय, किंवा हे ध्वनि काय, मला सारखेच वाटत. पण एखादी वाऱ्याची झुळुक बुल्बुल् पक्ष्याचे एकांताचे सूर, मुरलीची मोहक लकेर किंवा मृगाच्या नाभींतिल मृगमदाचा मादक सुगंध जेव्हां घेऊन येते, तेव्हां मात्र ती लोहचुंबकाप्रमाणं माणसाच्या साऱ्या चित्तवृत्ति आपल्याकडच खेंचून घेतल्यावांचून रहात नाहीं. हाच अनुभव ताई. काल दरबारांत मला आला. दरबारांत देवीचं घडलेलं तें अद्भुत दर्शन आणि तिच्या कोमल हृदयाच्या गाभ्यांतून निघालेला तो प्रेमपूर्ण करुणेचा नाद यांच्या योगानं माझ्या चित्तवृत्तींची तीच अवस्था झाली. तो नाद कानीं पडतांच क्रोधानं खवळलेला लोकसमुद्र एकदम शांत झाला ! आणि त्या मुखचंद्राच्या दर्शनानं तर तोच सागर पुन्हा प्रेमानं उचंबळलेला या कुमारानं आपल्या डोळ्यांनीं पाहिला. त्यावेळीं या कुमाराचे डोळे अश्रूंच्या नुसत्या लोटांनीं कांठोकांठ भरून आले होते. पण महामंडलेश्वरानं, परमेश्वरी आज्ञेनं वाहणारे ते अश्रूंचे लोट देखील आंवरून धरले पाहिजेत ! राजांची प्रतिष्ठा जाईल ! दरबारी स्त्री-पुरुषांत हसूं होईल ! आगंदा केव्हां केव्हां कोणा एका प्रतिभाशाली कवीचं गीत गुणगुणत असतो. 'रडायातेंहि जीवातें या-

लोकीं भाग्य लागते'! भारतवर्षाच्या महामंडलेश्वराच्या नशिबीं तें भाग्य नाहीं, हा अनुभव ताई, त्यावेळीं मला पुरेपूर आला ! सिंहासनावरील मखमालीच्या मऊ मऊ गाद्या त्यावेळीं मला कांट्याप्रमाणं बोचूं लागल्या. अंगावरचीं राजभूषणं अंगाचा दाह करूं लागलीं. आणि म्हणून–म्हणूनच ताई, तुझ्या आमंत्रणाचं निमित्त करून, हा कुमार त्यावेळीं दरबारांतून एकदम बाहेर पडला. तुमच्याजवळही या गोष्टींचा मला उच्चार करवत नव्हता. पण कालपासून माझी वृत्ति त्या दिव्यदर्शनानं भारून गेलेली आहे. देवीच्या संजीवनालयांत आपली प्रतिष्ठा सोडून ताई, तूं परिचारिका बनलीस, हें जेव्हां मला कळलं,—या कुमाराला धीर आला. महामंडलेश्वराच्या नशीबीं जें भाग्य नाहीं, तें ताई, तुझ्यामुळं या कुमाराला सुसाध्य आहे, असं वाटूं लागलं. ताई, परिचारक बनवून तुझ्याप्रमाणंच या कुमारालाही तिथं घेऊन चल.

**काकाजीः**—महाराज, महाराज, रात्रींप्रमाणंच ही शरीराची आणि मनाची ओढाताण होत आहे—

**कुमारसिंहः**—काकाजी, भूमीवर दिसणारीं हीं दिव्यदर्शन देखील या कुमाराला लाभत नाहींत असं जर झालं, तर बेहत्तर आहे शरीराची आणि मनाची ओढाताण झाली तरी–पण चंद्रलोक गांठण्यासाठीं रात्रीप्रमाणं हा कुमार मंदाकिनीच्या तळाचा ठाव काढल्यावांचून रहाणार नाहीं !

**खुषमस्कऱ्याः**—काकाजी, काळ्या कर्दमांतून वहात असलेली गंगा निरंतर पावन करणारी अशी धवलवर्णा कशामुळं राहिलेली आहे ? जटेवरील दिव्य चंद्राचा छंद घेऊन, त्याच्या चंद्रिकेशीं एकरूप झाली म्हणूनच ना ? ताईसाहेब, भावाचा पाहुणचार बहिणीनं भावाचे कोड पुरवल्याशिवाय होईल काय ?

**कमलाः**—काकाजी, आनंदा म्हणतो तेंच खरं. भाऊरायाचे वाटेल ते कोड बहिणीनं पुरवलेच पाहिजेत.

**कुमारसिंहः**—शाबास कमल ! आतां मात्र तूं या बाळपणच्या कुमाराची कमल झालीस !

**खुषमस्कऱ्याः**—रायाचं लगीन । भैनीचि केलवन । माल भरला सगीन । वल्हा वल्हव । घडिवलि गो च्येंदनाची ॥ नाव० ॥ [ जातात.

## प्रवेश दुसरा

[स्थळ:—मंत्रिसभा. **अमात्य, सेनानायक** व सरदारमंडळाचे दोन प्रतिनिधि **शुंभसेन** व **सज्जनसिंग** बसले आहेत.]

**सेनानायकः**—भर दरबारांत आमची इतकी अप्रतिष्ठा झाली असतांही अमात्य, आपण आम्हांला शांत रहायला सांगतां? आपणाला तरी हा अपमान कसा सहन होतो, तेंच आम्हाला समजत नाहीं.

**शुंभसेनः**—सेनापतीप्रमाणंच आम्हां सर्व सरदारांनाही वाटतं. सरदार-मंडळाच्या प्रतिष्ठेची झालेली बेअब्रू अमात्यांना पाहवते तरी कशी?

**अमात्यः**—सरदारमंडळाची प्रतिष्ठा वाढविण्याच्या कामांतच या अमात्यांनी आजपर्यंतचं आपलं बहुतेक आयुष्य वेंचलेलं आहे.

**सज्जनसिंगः**—म्हणून तर अमात्यांच्या सांप्रतच्या धोरणाबद्दल आम्हाला नवल वाटत.

**अमात्यः**—एकेकाळीं विस्कळीत आणि हतबल असलेली सरदारांची शक्ति एकवटून सबल करण्यासाठीं आज अर्धशतकपर्यंत कायावाचामनें-करून अहर्निश झगडत असतांनाच या अमात्याला वृद्धपण आलेलं आहे.

**सेनानायकः**—अमात्य, आपण केलेल्या बहुमोल कार्याबद्दल सरदार-मंडळाला कृतज्ञता वाटत नाहीं, असं का आपणाला वाटतं? आपली बुद्धिमत्ता, आपली कर्तबगारी यांविषयीं नेहमीं आम्हांला मोठा अभिमान वाटत असतो. अमात्यांसारखा राजकार्यधुरंधर पुढारी आम्हाला लाभला, याबद्दल सरदार-मंडळाला धन्यताच वाटते. तरी पण अमात्य, बोलतो याचा राग मानूं नका, काय असेल तें असो, आपल्या राजकारणांत आता पहिली धडाडी राहिली नसून, त्यालाही वयाप्रमाणंच वार्धक्य आलं कीं काय, अशी शंका येते.

**अमात्यः**—सेनापतीसाहेब, वार्धक्याला असं तुच्छ लेखूं नका. वार्धक्याला तुच्छ लेखून त्याच्या धीमेपणाचा आधार जर तरुणांनीं आपल्या पायांना घेतला नाहीं, तर त्यांची निवळ धडाडी ही इतर हीन प्राण्यांच्या मुसंडी-प्रमाणं नेहमीं भुइसरपट राहून अवसानघातकी होते. वार्धक्याचा धीमे-

पणाचा खंबीर पाया रचीत गेल्यानंच मनुष्याला अढळ असं उच्चस्थान प्राप्त झालेलं आहे.

**सेनानायकः**— वृद्ध अमात्य आम्हाला केव्हांही वंदनीय आहेत. पण एखाद्या बारिकशा लुकलुकणाऱ्या अग्नीच्या ठिणगीनं प्रचंड अरण्याला वांकोल्या दाखवीत रहावं! केवळ एका लहानशा डहाळीनं झटक्यासरशीं तिचा नायनाट करतां येत असतां वृद्धाच्या मुरवतीखातर तिची उपेक्षा करावी! आणि अखेरीस आपल्याच दुबळेपणानं तिचा वणवा पेटूं देऊन जगांत आपली छीःथू करून घ्यावी! अमात्य, वृद्धांचा असला दुबळेपणाचा सल्ला तरुणांच्या धडाडीला मानवणार नाहीं.

**अमात्यः**— वृद्धांचा सल्ला दुबळेपणाचा वाटला, तरी तोच विचाराचा असतो. वृद्ध असं सांगतील, कीं ज्या झटक्यासरशीं त्या अग्नीच्या ठिणगीचा आपण नायनाट करूं पहाल, त्या झटक्याच्या वाऱ्यामुळंच ती अग्नीची ठिणगी एकदम पेट घेईल!

**सेनानायकः**—मग काय, आम्हां सरदारांची एकवटलेली शक्ति इतकी प्रचंड असतांना आमच्या क्षात्रतेजाचा भरदरबारांत धडधडीत आमच्या तोंडावर अपमान होऊन आम्हीं मुकाट्यानं रहावं?

**अमात्यः**—प्रचंड शक्ति कांहीं काळ धीमेपणानं स्तब्ध राहिली तर तिला कांहीं कमीपणा येतो असें नाहीं. उलट तिच्या प्रचंडपणामुळं तिची थोरवी अशा वेळीं अधिकच जाणवते. सत्पक्ष असून योग्य समय—

**सेनानायकः**—साम्राज्याच्या रक्षणाला आणि वैभवाला अवश्य असलेल्या शक्तीची लोक कदर राखीत नाहींसे झाले—हा आमचा सत्पक्ष नव्हे काय?

**अमात्यः**—ऐका सेनापतीसाहेब, या वृद्धाचे दोन शब्द थोडा वेळ शांतपणानं ऐकून घ्या. सत्पक्ष आणि योग्य समय या दोहोंचा योग बरोबर जाणून जी शक्ति आपलं स्वरूप प्रगट करील, तिलाच पुण्यशक्ति म्हणतां येईल. आज अर्ध शतकपर्यंत आपलं सर्वस्व वेंचून या वृद्धानं जी शक्ति निर्माण केलेली आहे, ती पुण्यस्वरूपांत राहून माझ्या सरदारमंडळानं तिचा अखंड उपभोग घ्यावा, अशी या वृद्धाची मनीषा आहे. सेनापति-साहेब, मी आपणाला विचारतों, कीं दरबारांत लोकक्षोभाचं जें स्वरूप

दिसून आलं, त्यावरून आपला केवळ सत्पक्षच आहे, असं म्हणतां येईल काय ? सरदारमंडळानं आपल्या शक्तीचा स्वैरपणानं--

**सेनानायकः**—दुरुपयोग चालविला आहे, असंच आपलं म्हणणं ? सरदार मंडळावर हा आपला नेहमींचाच आरोप आहे. सरदारमंडळाकडून किंवा त्यांच्या सैनिकांकडून क्वचित् प्रसंगीं प्रजेला उपद्रव पोंचण्यासारखे कांहीं प्रकार होत असतील, मी नाहीं म्हणत नाहीं. पण कोणत्याही शक्तीचे हे सहजधर्म आहेत. त्यांपासून होणारा ताप मान्य करावाच लागतो. तो जर केला नाहीं, तर कोणत्याही शक्तीला आपलं कार्य करण्यासाठीं रेस. भर इकडे तिकडे वावरतां देखील येणार नाहीं. जीविताला अवश्य असणारी पर्जन्यशक्तीच घ्या. ती आपल्या वर्षावांत कित्येक ठिकाणीं जीविताचाच नाश करीत नाहीं काय ?

**अमात्यः**—सेनापतीसाहेब, मी केवळ शक्तीच्या असल्या सहजधर्माबद्दल बोलत नाहीं. आणि या वादांत अधिक खोल जाऊन आपला मनःसतापही वाढवीत नाहीं. माझं आपणाला इतकंच सांगणं आहे, कीं दरबारांत प्रत्यक्ष महाराजांनीं स्वीकारलेल्या धोरणाकडे लक्ष देऊन—

**सेनानायकः**—महाराजांची आज्ञा आम्हाला शिरसावंद्य असल्यामुळेच दरबारांत ती आम्हीं निमूटपणें मान्य केली. पण हा झाला तरी महाराजांच्याच विक्रमशक्तीच्या प्रतिष्ठेचा प्रश्न आहे. ती प्रतिष्ठा संभाळली नाहीं, तर राजसत्ताच डळमळीत होईल. आणि ती सांभाळण्याची जबाबदारी आमच्यावरच आहे.

**अमात्यः**—अलबत् ! संभाळा, संभाळा. काळवेळ पाहून ती आपण अवश्य संभाळा !

**सेनानायकः**—मग भर दरबारांत तिला कस्पटाप्रमाणं तुच्छ मानून लोक जेव्हां तिचा उपमर्द करतात—तेव्हां ही त्यांना शासन करण्याची योग्य वेळ नव्हे काय ?

**अमात्यः**—ती वेळ खुद्द महाराजांनीं टाळलेली आहे, हें सेनापतीसाहेब आपण लक्षांत घ्या. महाराज अल्पवयी असले तरी त्यांनीं दरबारांत काळासंबंधानं जे उद्गार काढले, ते या वृद्ध अमात्यालाही अर्थपूर्ण आणि मननीय वाटतात. काळाचं आपलं वर्तवलेलं गणित सेनापतीसाहेब, खरो-

खरच चुकलेलं आहे. केवळ मंत्रिजनांवर विश्वास टाकून आजपर्यंत त्यांच्या तंत्रानं वागणारे महाराज एकाएकीं स्वयंस्फूर्तीनं दरबारांत सेनापतीसाहेब, आपण करीत असलेल्या शासनाला आळा घालतात; दरबारचा इतका कडेकोट बंदोबस्त असतांना वीरनवालीसारखी एक स्त्री प्रत्यक्ष शांतता-देवीच्या देवायतनांत बेलाशक जाऊन बसते आणि ऐन वेळीं दरबारला तुच्छ लेखून प्रकट होते; खुद्द कमलादेवी ताईसाहेब आपल्या खवळलेल्या विक्रमशक्तीची पर्वा न करतां धिटाईनं पुढं येऊन त्या यःकश्चित् स्त्रीचं रक्षण करतात; आणि वत्सलादेवीसारखी एक अबला खवळलेला जनता-जनार्दन सहज लीलेनं शांत करते ! या कोणी बुद्धिपुरःसर घडवून आण-लेल्या घटना नसून अदृश्य रूपान आपले व्यापार चालविणाऱ्या काळाचे, दुबळ्या पण अहंमन्य मानवी बुद्धीला दिलेले हे इषारे आहेत. कोणतीही शक्ति गर्वान किंवा मदानं अंध होते, तेव्हां धीरगंभीर आणि कृपासागर काळ तिला प्रथम हे असले इषारे देत असतो. त्यांकडं ती शक्ति जर दुर्लक्ष करील, तर ती कितीही प्रचंड असेना, काळच तिची प्रतिष्ठा ठेवीत नाहीं. सेनापतीसाहेब, काळाचा इषारा म्हणून आणखीही एक नाजुक गोष्ट आपणाला सांगतों. राजभगिनी कमलादेवी ताईसाहेब यांनीं वीरनवालीचं रक्षण करण्यासाठीं जसं आपल्या विक्रमशक्तीला तुच्छ लेखलं, तसच प्रेमाच्या बाबतींतही—

**सेनानायकः**—काय ?

**अमात्यः**—ताईसाहेबांचं प्रेम कोणावर बसलं आहे असं आपणाला वाटतं?

**सेनानायक** व **सरदारः**—कुणावर ? कुणावर ? कुणावर ?

**अमात्यः**—दीनदासावर !

**सेनानायकः**—काय ! त्या यःकश्चित् क्षुद्र माणसावर ?

**शुंभसेनः**—म्हणजे राजभगिनीनं आमच्या क्षात्रिय कुळांना लज्जेनं खालीं मान घालायला लावलं म्हणायचं ? हें आम्ही कधींही सहन करणार नाहीं.

**अमात्यः**—राजकुलीन क्षत्रियतरुणींचीं अंतःकरणं सामान्य जनांच्या पराक्रमावर अनुरक्त होऊं लागलीं–माझ्या क्षत्रिय वीरांनो ! लक्षांत घ्या, रुक्मिणीचं अंतःकरण गवळ्यावर बसलं–तर ही गोष्ट काळाचा इषारा म्हणून आम्ही न मानतां केवळ अपमानाच्या त्वेषानंच आम्ही तिचा

प्रतिकार करूं लागलों, तर रुक्मिणीच्या हट्टी भावाची आणि शिशुपालाची जी अवस्था झाली, तीच कदाचित् सरदारमंडळाची होईल कीं काय, याची या वृद्ध अमात्याला भीति वाटते.

**सेनानायकः**—अमात्य, पुराणांतल्या त्या भाकडकथांचा बागुलबुवा बायाबापड्यांनीं किंवा तुमच्यासारख्या वृद्धांनीं खुशाल मानावा. ज्यांनीं साम्राज्याच्या प्रचंड शत्रूंचा आपल्या बाहुबलानं निःपात केला, ते आम्ही असल्या बागुलबुवांना भीक घालणार नाहीं. राजकुलीन क्षत्रिय तरुणी हे केवळ आम्हां क्षत्रिय सिंहाचेच भाग आहेत. त्यांना जर दीनदासासारखे जंबूक आपल्या बाजेगिरीनं भुलवूं लागले, तर त्या जंबुकांची शिकार करून त्यांचा नायनाट केल्याखेरीज आम्ही रहाणार नाहीं. अमात्य, निष्कारण काळाचं बुजगावणं आम्हांला दाखवूं नका. आपणाला भीति वाटत असेल तर आपण स्वस्थ रहा. ती वीरनवाली, ती वत्सलादेवी, दीनदास आणि त्याचे लोक हीं सर्व, परवांच्या दरबारांतील त्यांच्या वर्तनानं अपराधी ठरलेलीं आहेत. त्यांना शासन करण्यासाठीं मुद्रांकित राजाज्ञा तेवढी आमच्याजवळ द्या आणि सर्व जबाबदारी आमच्यावरच टाका.

**अमात्यः**—सेनापतीसाहेब, वीरनवालीला राजभगिनी कमलादेवी ताईसाहेबांनीं पाठिशीं घातलेली आहे. आणि वत्सलादेवीसंबंधानं म्हणाल, तर तिच्या संजीवनालयाकडं खुद्द महाराजच आतां गेलेले आहेत.

**सेनानायकः**—काय, महाराज संजीवनालयाकडं गेले आहेत ?

**अमात्यः**—होय. हेराध्यक्षांनीं हें वर्तमान आतांच येऊन कळवलं. शिवाय, सेनापतीसाहेब, साम्राज्यांतील स्त्रियांच्यासंबंधाची कोणतीही राजाज्ञा मी केवळ आपल्याच जबाबदारीनं केव्हांच देणार नाहीं.

**सेनानायकः**—मग निदान दीनदास आणि त्याचे लोक—

**अमात्यः**—लोकांना सेनापतीसाहेब, तूर्त आपण धक्का लावूं नका. आतां दीनदासासंबंधानं म्हणाल, तर त्याला फक्त पकडून तुरुंगांत ठेवण्या-पलीकडं आपण अधिक कांहीं करणार नसाल, तर त्याच्यापुरती तेवढी राजाज्ञा मी आपणाला देईन. ती देखील अपमानाच्या त्वेषानं नव्हे, तर राजकारणाच्या धोरणासाठींच होय. ताईसाहेबांचं प्रेम दीनदासावर गेलं, या योगानं राजकारणी पुरुषांच्या उपयोगी पडणारं राजबीज स्वेच्छाचारी

झालं, अस होतं. राजबीज हें जात्याच प्रभावशाली आहे. तें जर स्वेच्छाचारी होईल, तर राजकारणांत ती एक घातुक शक्ति होण्याचं भय असतं. यासाठीं, ताईसाहेबांचं प्रेम ज्या व्यक्तीवर गेलं, ती व्यक्ति आपल्या ताब्यांत असावी, एवढ्यासाठींच मी आपणास दीनदासाला पकडण्याविषयींची राजाज्ञा या वेळीं देत आहे.

**सेनानायकः**—चिंता नाहीं. दीनदासाला नुसत्या पकडण्यानंही अंशतः का होईना पण आमच्या दरबारांतील अपमानाची भरपाई होणार आहे. तेव्हां तूर्त अमात्यांच्या धोरणाला मान देऊन, इतर गोष्टींबद्दलचा आम्ही आपला आग्रह सोडून देण्याला तयार आहों.

[ **सेनानायक व सरदार** अमात्यांना अभिवादन करून जातात.]

**अमात्यः**—कोण आहे तिकडं ? कोतवाल ?

**कोतवालः**—( प्रवेश करून ) आज्ञा अमात्य.

**अमात्यः**—महाराजांच्या खास तैनातींतील क्रीडामंदिराच्या मायावती आल्या असतील, त्यांना येऊं द्या.

**कोतवालः**—आज्ञा. [ जातो.

**अमात्य**—महाराजांची स्वारी संजीवनालयाकडं गेली ! मनाला इतकी चुटपुट कां लागावी ? कां–ला–गा–वी ! राजबीज ! स्वेच्छाचारी झालं—

[ **मायावती** येऊन मुजरा करते.

**अमात्यः**—अमर्याद तैनाती देऊन संभाळलेल्या मायावती आणि त्यांच्या क्रीडामंदिरांतील विलासाचे अष्टभोग हे केवळ व्यर्थच ठरले काय?

**मायावतीः**—( हात जोडून ) या दासीकडून महाराजांच्या सेवेंत कांहीं कसूर झाली काय ?

**अमात्यः**—मग महाराजांचं चित्त रमत कां नाहीं ? दरबार सोडला–राजभगिनी ताईसाहेबांकडे गेले–तें योग्य होतं–पण पुढं तिकडंही जायचं सोडलं !–मृगया नाहीं, क्रीडामंदीर नाहीं–भलतीकडंच कां गेले !

**मायावतीः**—भलतीकडं ?

**अमात्यः**—होय. महाराजांची स्वारी त्या संजीवनालयाकडं गेली ! बरोबर लवाजमा नाहीं तर नाहीं, पण क्रीडाविलासाची देखील अपेक्षा वाटू नये ?

**मायावतीः**—आज्ञा व्हावी. ही मायावती सर्व विलाससामुग्री घेऊन तिकडं तावडतोब जाईल.

**अमात्यः**—आतां जाण्यांत काय अर्थ आहे ? महाराजांना अपेक्षा वाटली नाहीं, यांतच कसूरी आहे. कलावंत खातं कलाविहीन ठरलं ! लाजिरवाणी गोष्ट आहे ! या आतां. महाराज परत आल्यानंतर आपल्या कलेची कसोटी पाहूं. [ **मायावती** मुजरा करून जाते. ] राजबीज ! आज-काल तें दिसण्यांत जरी निर्जीव, निःसत्व असलं, तरी मुळांतच तें प्रभाव-शाली आहे. मुत्सद्द्यांच्या भारणींतून तें सुटून स्वेच्छाचारी होऊं लागलं—तर न जाणो—छेः, राजभगिनीचं मन तशा रीतीनं आमच्या भारणींतून सुटूं पहात आहे ! महाराजांचं मन जर—मंत्राचे प्रयोग सावधपणानं केले पाहिजेत. [ जातात.

---

## प्रवेश तिसरा

[ **स्थळः**—संजीवनालयाभोंवतालचा बाग. **काकाजी** व **खुषमस्कऱ्या** येतात.]

**काकाजीः**—परमेश्वरानं खैर केली, कांहीं भलतं सलतं झालं नाहीं, महाराज चांगले सुखरूप आहेत, हें सगळं खरं; पण महाराज स्वच्छंदानं भलभलते अविचार करूं लागले आहेत, त्यामुळं ताईसाहेबांचा आमचा सर्वांचाच जीव उडून गेला आहे. काय परवांचं तें भयंकर साहस ! शुद्ध अविचार ! आणि तुझी या गोष्टीला भर !

**खुषमस्कऱ्याः**—माझी ? आपल्या कानीं सात खडे ! पण ते साधे नव्हेत ! हा महामंडलेश्वरांचा खुषमस्कऱ्या आहे ! हिरा, पांच, नील, प्रवाल, पद्मराग—असले सात खडे !

**काकाजीः**—आनंदा, परवांच्या महाराजांच्या भलत्या साहसानंतरही तुला हा सगळा खेळच वाटतो ?

**खुषमस्कऱ्याः**—परवांचा प्रकार झाला कसा याची कल्पनासुद्धां हा वेळपर्यंत या आनंदाला नाहीं. आणि तुम्ही म्हणतां याची त्याला भर !

**काकाजीः**—तुला तें सांगायला ह्या वेळपर्यंत मन थाऱ्यावरच नव्हतं. कालचा सबंध दिवस महाराजांच्या शुश्रूषेंत आणि काळजींत गेला. शिवाय या सजीवनालयांत महाराज आपलं स्वरूप झांकून छद्मवेषानं आलेले! तेव्हां इथं तिथं मन मोकळं बोलायलाही चोरी! त्या दिवशीं मंदाकिनी–कांठच्या त्या वनांतून महाराज इकडं यायला निघाले, तुला ताईसाहेबांनीं माईंना आगाऊ सूचना देण्यासाठीं इकडं पुढं पाठविला. मागाहून महाराजांबरोबर आम्ही घोड्यावरून सावकाश येत होतों. वाटेंत बोलतां बोलतां ताईसाहेब सहज म्हणाल्या, 'महाराज, संजीवनालयासारख्या ठिकाणीं आपणांसारख्या सम्राटांना परिचारकाच्या वेषांत असं किती वेळ आणि कसं राहतां येईल ?' हें ऐकून महाराजांनीं आपला घोडा क्षणमात्र थांबवला. आणि किंचित् विचार केल्यावर एकदम उल्हासाच्या उसळीनंच म्हणाले, 'पण जखमी झालेल्या कुणाही घायाळाला राहतां येईल, नाहीं ?' आणि काय! तीरासारखा त्यांनीं आपला घोडा भरधांव फेंकला! आणि काय करतात, तें कळण्यापूर्वींच त्या भरधांव घोड्यावरून त्यांनीं ताडकन्—

**खुषमस्कऱ्याः**—काय, उडी घेतली म्हणतां ?

**काकाजीः**—आनंदा, त्या देखाव्याची कल्पना देखील करवत नाहीं. सर्व अंतराळ गर गर गर फिरत आहे कीं काय, असं त्यावेळीं वाटलं! ताईसाहेबांना तर मूर्च्छाच येत होती. कुठंतरी रानावनांत मस्तकांतून भळभळां वाहाणारं तें मूर्धाभिषिक्त राजाचं रक्त—ताईसाहेबांनीं कशी बशी आपल्या पदराच्या पट्टीन जखम बांधली आणि आम्ही त्यांना इकडं घेऊन आलों. माईंना प्रथम काय सांगावं, तेंच सुचेना. दीनदास वगैरे मंडळीही सध्यां इथंच. अखेरीस सांगितलं, कीं गांधारदेशचा एक तरुण वीर दरबारचा समारंभ पाहण्यासाठीं आला होता, तो शिकार करीत असतां घोड्यावरून पडलेला आढळला. तेव्हां त्याला इकडं उपचारासाठीं घेऊन आलों. पुढचा प्रकार तुला ठाऊकच आहे.

**खुषमस्कऱ्याः**—हो! गंगेनं कड्यावरून उडी घेतली, तरी तो पावन गंगेचा उल्हासाच्या उडीचा आग्र! अखंड उल्हासांत चल रहे है!

**काकाजीः**—धन्य वत्सलामाई! त्यांच्या वत्सलतेच्या प्रेमाचा हस्तस्पर्श

महाराजांच्या जखमेला झाला मात्र—या संजीवनालयांतील संजीवनीमात्राच ती !—महाराज लगेच सावध झाले ! आणि माईचे प्रेमाचे मृदुशब्द कानीं पडतांच त्यांच्यांत नवजीवन आलं !

**खुषमस्कऱ्याः**—प्रजेच्या संजीवनालयांत महाराजांचं नवजीवन ! काय योगायोग आहे ?

**काकाजीः**—योगायोग काय असेल तो खरा. पण आतां पुढं काय ? आणि महाराजांनीं हें असलं साहस करावं तरी कां ? असं साहस करून या संजीवनालयामध्यें येण्यांत त्यांचा हेतु तरी काय ? देवीवत्सलामाईचं दर्शन घ्यायचं, तर तें काय महामंडलेश्वरांना दुर्लभ होतं ?

**कमलाः**—( प्रवेश करून ) काकाजी, आतां हा भयंकर चिंतेचा भार या राजभगिनीला अगदीं असह्य झाला आहे. महाराज माझे बंधुराय, तसेच ते या अखिल भारतवर्षाचे पंचप्राण आहेत. ते या भगिनीकडं म्हणून पाहुणचाराला आले. पण प्राण आपली कुडी सोडून स्वच्छंदानं वावरूं लागले, भलभलतं साहस करूं लागले, तर अखिल भारतवर्ष या भगिनीला काय म्हणेल ? दरबारकडं हें कळवलंच पाहिजे. आणि माईलाही मला विश्वासांत घेतली पाहिजे. नाहींतर या राजभगिनीचं हृदय आतां फाटून जाईल कीं काय, असं मला झालं आहे.

**वत्सलामाईः**—( हलकेच मागं येऊन व कमलादेवीच्या खांद्यावर हात ठेवून ) राजभगिनी हृदयाची कोमल असली, तरी मनाची खंबीर आहे !

**कमलाः**—कोण, माई ?

**वत्सलामाईः**—होय, ताईसाहेब !

**कमलाः**—माई ! इतक्यांत मी तुला परकी ताईसाहेब झालें ? पण मीच चुकलें, मींच तुझ्याशीं प्रतारणा केली. दरबारचं किंचित् वारं घेऊन आलें—

**वत्सलामाईः**—वारं कां ? सारंच घेऊन आलें म्हण !—चपापूं नको, मला सगळं माहीत आहे ! आनंदानं मला सगळं सांगितल आहे !

**कमलाः**—( आनंदाकडे दटावणींनें पाहून ) आनंदा !

**खुषमस्कऱ्याः**—( तिकडे लक्षच न देतां दुसरीकडे कानोसा घेतल्या-

सारखें करून) जी सरकार! कुणी, महाराजांनींच हांक मारली, नाहीं? आलों आलों ऽऽ! [जातो.

**कमलाः**—काय लबाड आहे!

**वत्सलामाईः**—तो लबाड कां कोण लबाड, तें ठरायचं आहे म्हणा!

**कमलाः**—माई, तुझ्याशीं—

**वत्सलामाईः**—चूप! आतां बोलायचं नाहीं! आमच्याकडं एक वीरसेन म्हणून गांधार देशाचे पाहुणे जखमी होऊन आलेले आहेत! माझा भाई दीना, मोतीराम वगैरे मंडळी त्यांच्याशीं परवांच्या दरबारबद्दल मोठ्या आवेशानं चर्चा करीत असून, ती सारी मंडळी इकडंच यायला निघाली आहे. ताई, हा योग कांहीं अपूर्वच आहे, नाहीं?

**कमलाः**—तुम्हाला बरा सगळ्यांना हा योग अपूर्व वाटतो. पण महाराज एकटेच इकडं आलेले, त्यामुळं माझं मात्र काळीज फाटून जात आहे.

**वत्सलामाईः**—कमलताई, यांत इतकं घाबरण्यासारखं काय आहे? महाराज एकटे असले, तरी ते कांहीं शत्रूच्या राज्यांत नाहींत. आपल्या स्वतांच्या राज्यांत, प्रेमळ प्रजेच्या सहवासांत, इतकंच नव्हे, तर जिव्हाळ्याच्या माणसांत आहेत.

**कमलाः**—तें सगळं खरं. पण त्यांच्या भलभलत्या साहसांचं फार भय वाटतंग.

**वत्सलामाईः**—कमल, खरं सांगू. मला तर महाराजांची ही साहसी वृत्ति पाहून उलट समाधानच वाटतं. भारतवर्षाच्या सिंहासनावर दुबळं बाहुलं नसून, एक साहसी नरश्रेष्ठ विराजमान झालेला आहे, ही गोष्ट समाधानाची नव्हे काय? आज त्या साहसांत अविचार दिसत असेल. पण त्यांतच, मनांत आणलेली गोष्ट निश्चयानं साध्य करून घेण्याला अवश्य असलेली वीरवृत्ति दिसून येत नाहीं काय? विलासांत कोंडलेल्या महाराजांच्या राजस मनाला योग्य असं ध्येय नाहीं. पुरुषार्थाला वाव नाहीं. असल्या मनाला उज्ज्वल असं योग्य ध्येय मिळालं, तर कमल, तुला सांगून ठेवतें कीं, हीच साहसी वृत्ति परमपुरुषार्थाची जन्मदात्री होईल!

**काकाजीः**—माईजी, ती पहा महाराज वगैरे मंडळी आलीच. महाराजांच्या मस्तकावर राजचिन्हाऐवजीं मलमपट्टी!

**वत्सलामाई**:—पण काकाजी, खुद्द महाराजांना तीच जणुं राजचिन्हां-सारखी वाटते आहे! इतकी जखम झाली आहे, तरी उल्हासांत कमी-पणा दिसतो का?

**कमला**:--उलट, काय असेल तें असो, पण इथं आल्यापासून तो जसा कांहीं द्विगुणित झाला आहे! माई पाहिलंस का, आपला तो नुकताच चालूं लागलेला लंगडा योद्धा व्रजलाल, त्याला आपल्या हाताचा आधार देऊन महाराज त्याच्याशीं बोलत येत आहेत!

**वत्सलामाई**:—खरोखर राजाचा दुबळ्या प्रजेला जर असाच आधार मिळेल! अगबाई आलेच हे. आतां गप्प! आपले परदेशचे पाहुणे गांधार देशचे वीरसेन आहेत, हें लक्षांत ठेवलं पाहिजे!

[ लंगडा योद्धा **व्रजलाल** याला आपल्या खांद्याचा आधार दिलेले महाराज **कुमारसिंह, दीनदास, मोतीराम,** वगैरे येतात. **कमलादेवी व्रजलाला**-साठीं आसन आणते व **वत्सलादेवी** त्याला हातानं धरून बसवते.]

**व्रजलाल**:—अहो वीरसेन, परचक्राचं भेसूर चित्र उभं करून त्यावेळीं सरदारमंडळानं आम्हाला राष्ट्राभिमानानं भारून टाकलं. इतिहासपुराणां-तील क्षात्रधर्माची महति गाऊन आमची मति गुंगवली. स्त्रियांना वीर-माता, वीरपत्नी, वीरभगिनी अशा रीतींनं गौरवून त्यांच्याकडून आम्हांला प्रोत्साहन दिलं. अपार लुटीची लालुच दाखविली. अशा नानाप्रकारच्या उद्दीपनांनीं धुंद करून त्या आवेशांतच आम्हांला रणभूमीकडं नेण्यांत आलं. झालं, मग काय? आम्हीं मनसोक्त शत्रुसंहार केला! पुढं, तद्दानंतर उभयतां शत्रु मित्रभावांनं जेव्हां एकमेकांना भेटलों, तेव्हां आमच्याप्रमाणं त्या बिचाऱ्यांनाही परचक्राचं भय दाखवूनच आमचे प्राण घेण्यासाठीं रणभूमीवर आणलं होतं, अशी आमची बालंबाल खात्री झाली! सारीं आम्ही एका परमेश्वराचीं लेकरं! उभयतांही निरपराधी! असं असून हाड-वैऱ्याप्रमाणं आम्हीं एकमेकांचे बेलाशक प्राण घेतले! तेव्हांपासून वीरसेन, या युद्धाबद्दल इतकं मन पस्तावून गेलं आहे—

**कुमारसिंह**:—व्रजलाल, माफ करा. या तुमच्या संजीवनालयांत पाऊल टाकल्यापासून मला तर असं वाटूं लागलं आहे कीं, या भारतवर्षानं अहर्निश युद्ध चालूं ठेवावं! आणि आपण भारतवर्षाचा एक सैनिक

म्हणून कल्पनातीत आनंद देणाऱ्या येथील मोहक शुश्रूषेचा लाभ घडावा, म्हणून अनेकवार जखमी होऊन, या संजीवनालयांत यावें !

**ब्रजलालः**—हें मात्र वीरसेन आपण यथार्थ बोललांत ! इथं आल्यावर आपली जर अशी वृत्ति न होती, तरच तें आश्चर्य ! केवळ युद्धामुळचं अमृताचा वर्षाव करणाऱ्या अशा माईजींच्या अपार वात्सल्याचा आम्हाला लाभ घडला !

**खुषमस्कऱ्याः**—( एकदम प्रवेश करून ) मी देखील आतां अमृताचा लाभ घडावा, म्हणून देवदानवांना पुन्हा समुद्रमंथन करण्याची प्रार्थना करणार आहें ! मद्य आणि हालाहल वीष त्याबरोबर निघेल !—मद्याचा स्वीकार सांप्रतकाळीं व्हायला कांहीं पंचाईतच नाहीं म्हणा ! सहस्रपट उल्हासानं होईल ! पण हालाहलाचा स्वीकार सांप्रतकाळीं कोणी आणि कसा करायचा ? प्रश्न तेवढाच आहे !

**कुमारसिंहः**—सम्राटांच्या खुषमस्कऱ्यांचा जयजयकार असो ! परवां दरबारला आपण सडकून शिंकेचा इषारा दिलात, तो ऐकून आपण तर फार खूष झालों !

**खुषमस्कऱ्याः**—खूष झालांत ? खरंच खूष झालांत ? मस्करीनं नव्हे ! हो ! नाहींतर आम्ही काय, खुषमस्करे ! म्हणाल, कीं तुमच्या मस्करीनं खूष झालों !

**कुमारसिंहः**—नाहीं, नाहीं ! खरंच खूष झालों !

**खुषमस्कऱ्याः**—करा तर मग यावेळीं बहाल त्याची तपकिरीची डबी !

**कुमारसिंहः**—तुमच्या तपकिरीच्या डबीचं हें गूढ काय आहे, तें जर आम्हाला समजेल—

**खुषमस्कऱ्याः**—समजेल ! समजेल ! न सांगतां—नकळत—आपोआप समजेल ! कारण—कारण सांगूं का ?

**एकाच्या मनांत । मन साऱ्या जनांत ।**
**जनीं जनार्दन । राजा—वनांत !!!**

भरताचा बाप राजा दुष्यंत ! वनांत शिकार करायला आला ! तों हरणानं आपल्या धनुकलीनं त्याचीच शिकार केली ! झालं, कण्वाच्या आश्रमांत शकुंतला भेटली ! पण कण्वमुनीच नाहींत !

**कुमारसिंह**:—चला! तुम्हां खुषमस्कऱ्यांना सगळीच मस्करी! बरं व्रजलाल, तुम्ही काय म्हणतां? युद्धाला दोष देतां? पण त्या युद्धामुळं भारतवर्षाला अभिमान वाटण्यासारखा अपूर्व विजय मिळाला नाहीं काय?

**दीनदास**:—अभिमान वाटण्यासारखा अपूर्व विजय! कौरव-पांडवांच्या भारती युद्धांत खरोखर दुष्टांचा सहार झाला असतांही धर्मराजाला अखेरीस तो विजय अभिमानास्पद वाटला नाहीं. पराजयाइतकाच त्याचा त्याला वीट आला. मग इथं तर गरीब, निरुपद्रवी, निरपराधी अशा प्रजेचा संहार होऊन, दुष्टच या युद्धामुळं अधिक प्रमत्त झाले आहेत!

**कुमारसिंह**:—भारतवर्षीयांना या विजयाबद्दल असं वाटतं?

**मोतीराम**:—असं न वाटेल तर काय वाटेल? रणांगणावर क्षणमात्र मन विजयानं धुंद झालं; उल्हासानं वृत्ति भरुन गेल्या; वैभवानं डोळे दिपावून गेले. पण घरीं आल्यावर तें वैभव हाहा:कारानं ऊर बडवीत आहे असं पाहून, धुंदी पार उतरून गेली! सारे कर्ते पुरुष नाहींसे झाले! भूमीची मशागत नाहीं! धनधान्य दुर्मिळ झालं! दुष्काळानं रणभूमीपेक्षांही उग्र, भेसूर, भयानक रूप धारण केलं!

**व्रजलाल**:—त्यांतच, वैऱ्यांवर सोडलेलीं भूतं वैऱ्याचा फन्ना केल्यावर खावावून जशीं सोडणारावरच उलटतात; तसे रणांगणावर गाजलेले लूटबहाद्दर आतां घरचेच वतनदार लुटारू बनले आहेत!

**दीनदास**:—रणांगणावरील सैनिकांची हक्काची लूट सरदार-मंडळानंच आपसांत वांटून घेतली. आणि प्रजेनं युद्धापायीं आपलं कृषीकर्म, आपलीं खिल्लारं, आपले कर्ते पुरुष भरी घातले, तरी देखील अद्याप युद्धखर्चाची भरपाई करण्यासाठीं म्हणून प्रजेवर असह्य कर लादले आहेत! आणि ते दुष्काळांतही जुलूमजबरीनं वसूल केले जात आहेत!

**कुमारसिंह**:—मी स्वप्नांत तर नाहीं ना? अशा गोष्टी क्वचित् प्रसंगीं स्वप्नांत—

**मोतीराम**:—वीरसेन, तुमच्या राज्यांत तुम्हाला हें स्वप्न वाटत असेल!

**कुमारसिंह**:—खरंच. माझ्या राज्यांत अजून मला हें स्वप्नच वाटत आहे!

**खुषमस्कऱ्या**:—अहो, गांधारदेशचे वीरसेन! बळेंच डोळ्यांना पट्टी बांधून घेणारी गांधारी आपल्या राज्यांतलीच नव्हे का? पुण्यशील साध्वी,

हृदयाची थोर, पण आपणच अशी डोळेझांक केल्यामुळं, दुर्योधनादिकांचे चाळे कांहीं काळ तिलाही स्वप्नासारखेच वाटत होते !

**कुमारसिंहः**—खुषमस्करेमहाराजांनीं टोला तर बरोबर दिला ! मी यावेळीं राजा असतों, तर काय केलं असतं ?

**खुषमस्कऱ्याः**—आमचे कान चांगले लंबे करून, मला आपला खुष-मस्कऱ्या केला असतात !

**दीनदासः**—वीरसेन, दरबारांत शांततादेवीच्या देवायतनांतून प्रगट झालेली वीरनबाली पाहून देखील तुम्हाला हें स्वप्न वाटतं काय ?

**कुमारसिंहः**—(दचकून) खरंच, तुम्हीं आतां आठवण केलीत म्हणून,—पण नाहीं, मला तिला स्वप्नांतच पाहिल्यासारखी वाटते.

**दीनदासः**—आपल्या स्वतांच्याच राष्ट्राची परक्याजवळ नालस्ती करणं जिवावर येतं. पण एक वेळ अशी येते कीं, दुखणं वेशीवर टांगल्या-वांचून इलाज नसतो. वीरसेन, ज्यांचा मतलब साधण्यासाठीं हा एवढा युद्धाचा यज्ञ झाला, ते सेनापति आदिकरून सरदार लोक त्या यज्ञ-सिद्धीनं इतके उन्मत्त झाले आहेत, कीं त्यांनीं प्रजेची दैना दैना तर केलीच आहे, पण ज्या वीरपत्नी, वीरमाता, वीरभगिनी यांनीं आपले पति, पुत्र, बांधव त्यांच्या त्या यज्ञांत बळी दिले, त्यांच्याच पातिव्रत्यावर, कौमार्यावर हे अधमाधम पशुवृत्तीनं मनसोक्त घाले घालीत आहेत ! अशा रीतीनं गांजलेली भारतमाताच त्या वीरनबालीच्या रूपानं आक्रोश करीत त्यावेळीं अवतरली, असं तुम्ही समजा !

**कुमारसिंहः**—तिचं रक्षण करण्यासाठीं ऐन वेळीं तुमच्या राजभगिनीनं किती अलोट धैर्य दाखवलं !

**दीनदासः**—अखिल भारतवर्ष याबद्दल त्यांचे धन्यवाद गात राहील !

**कमलाः**—आणि माईनीं तर त्याप्रसंगीं—

**दीनदासः**—माझ्या वत्सलेनं ? एखाद्या सम्राटालाही साध्य होणार नाहीं, ती गोष्ट केली !

**कुमारसिंहः**—रास्त बोललांत ! देवीनीं त्या प्रसंगीं भारतवर्षाच्या सम्राटांची अब्रू वांचवली. सम्राटाला शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा जबरदस्तीनं

देवायतनांत करतां आली नाहीं. पण देवींनीं तिचं दर्शन घडवून स्वकीयांचा रक्तपात टाळला. भारतवर्षाच्या सम्राटांनीं याबद्दल देवींचं ऋणी असलं पाहिजे.

**वत्सलामाई**:— वीरसेन, सम्राटांच्या राज्यांत तुम्ही आणि माझा भाई-राय उभयतांही सम्राटांना ऋणी करून कमी लेखतां ! हा राजद्रोह होईल बरं !

**दीनदास**:—ताई, मला राजद्रोहाचं भय नाहीं. पण दरबारांत माझ्या हातून सेनापतिद्रोह मात्र झाला आहे !

**कुमारसिंह**:—आणि माझ्या राजद्रोहाबद्दल देवी जें शासन करतील, तें भोगायला मी तयार आहें. स्वतःचं राज्य सोडून भटकणारा हा प्राणी—

**खुषमस्कऱ्या**:—त्याला एकदम त्याच्या राज्यांत हांकून दिला पाहिजे ! आमच्या सम्राटांचा द्रोह करणाराचा मला असा राग आला आहे—

**कुमारसिंह**:—सम्राटांबद्दलचा तुम्हां सर्व प्रजाजनांचा हा अभिमान पाहून मोठा संतोष वाटतो. पण ही तुमची त्यांचे ठायीं असलेली निष्ठा जरा अपूर्वच नव्हे का ? त्यांच्या या राजवटींत इतकी तुमची दैना चालली आहे, अनन्वित जुलूम होत आहेत—

**मोतीराम्**:—वीरसेन, बरोबर बोलतां. या लोकांना महाराजांबद्दल मोठी निष्ठा वाटते. पण या मोत्याला यत्किंचितही वाटत नाहीं. अहो, जो राजा इतके जुलूम चालले असतांही मायावतीसारख्या विलासवतीच्या विलासांत अष्टभोग घेत धुंद असतो, जरासुद्धां डोळे उघडून पाहात नाहीं त्या राजाबद्दल कसली निष्ठा ? आणि कसला अभिमान ?

**कमला व काकाजी**:— मोतीराम, मोतीराम, काय हें ?

**मोतीराम**:—'काय' काय ?

**दीनदास**:—मोत्या, चूप ! तुझी जीभ महाराजांविरुद्ध—

**मोतीराम**:—कुत्रा चंद्रावर भुंकायला भीत नाहीं, तो महाराजांना भिईल ? भाईजी, या मोत्याची अशी मुस्कटदाबी करूं नका.

**वत्सलामाई**:—मोती, उगी बेटा. तोंड कां दुखवून घ्यावं ?

**मोतीराम**:—माईजी, तुम्हीच काय ते याचे वाली आहांत. याला आतां कुणीसुद्धां गोंजारीत नाहीं हो ! बाप्पाजी अदृश्य झाल्यापासून—

**कुमारसिंह**:—बाप्पाजी ? बाप्पाजी कोण ?

**मोतीराम**:—काय, बाप्पाजी आपणाला ठाऊक नाहींत ? दिगंत कीर्ति

असलेले आमचे स्वामी विश्वानंदजी आपणाला ठाऊक नाहींत ? ते ठाऊक नाहींत असा प्राणी या जगांत एकच असेल. आणि तो म्हणजे अष्टभोगांत निमग्न असलेला आमचा राजा !

**कुमारसिंह**:—युद्धापासून अलिप्त राहाण्याविषयीं जे प्रजेला उपदेश करीत होते, तेच स्वामी विश्वानंदजी काय ?

**मोतीराम**:—होय तेच ! ते आपणाला ठाऊक नाहींत ?

**कुमारसिंह**:—ते या वीरसेनाला ठाऊक आहेत. पण त्यांचा इथं संबंध ?

**कमला**:—संबंध ? हें अपार वात्सल्य आणि हें धीरोदात्त दीनांचं दास्य या दोन गुणमूर्तींचा संभव स्वामी विश्वानंदजींपासूनच आहे !

**कुमारसिंह**:—काय, हीं उभयतां स्वामिजींचींच अपत्यं ? देवींचा संभव स्वामी विश्वानंदजीपासून ? देवी ! स्वामिजीचं दर्शन या तुमच्या पाहुण्याला घडलं असून, त्यांच्यासंबंधाची एक शुभवार्ता आपणाजवळ— आणि आपणां एकट्याजवळ सांगण्याची भिक्षा हा अतिथी मागत आहे.

**वत्सलामाई**:—ती शुभवार्ता आहे, मग तिचा आस्वाद एकदमच सर्वत्रांनीं घ्यायला काय हरकत आहे ?

**कुमारसिंह**:—तें एक राजकीय गुह्य आहे.

**खुषमस्कऱ्या**:—आमच्या तर्पकिरीच्या डबीचंच म्हणाना ! जें राजाचं राजगुह्य, तेंच राजाच्या खुषमस्कऱ्याचं ! मग या खुषमस्कऱ्याला इथं असायला कांहींच हरकत नाहीं. शिवाय याला आहेत दरबारी कान ! न ऐकणारे कान ते दरबारी कान ! मग तें गुह्य—

**कुमारसिंह**:—छेः, छेः, तें केवळ देवीजवळच प्रगट करायचं आहे.

**खुषमस्कऱ्या**:—सृष्टीचं राजगुह्य परमात्म्यानं एकट्या आदिमाये-जवळच प्रगट केलं ! चला भाईजी, आपण येथून दुसरीकडे जाऊं.

**मोतीराम**:—माझ्या बाप्पाजींचं शुभवर्तमान आपण प्रगट करीत आहांत ! कुणीं इकडं फिरकूं नये, म्हणून हा मोत्या दूर अंतरावर टेहळणी करीत राहील !

**कुमारसिंह**:—शाबास ! मी जर राजा असतो तर अष्टभोगांत निमग्न न राहतां मोतीराम, तुमची मुस्कटदाबी मी प्रथम कायमची काढून टाकली असती !

[ **सम्राट् कुमारसिंह** व **देवी वत्सलामाई** खेरीज सर्व जातात.

**कुमारसिंहः**—देवी! लोकवार्ता अशी कीं, स्वामीजी अदृश्य झाले. पण वस्तुतः ते राजकारणासाठीं भारतवर्षाच्या राजाच्या कैदेंत असून, त्यांना कैदेंत टाकणारा राजा कृतकर्माबद्दल कष्टी होऊन यावेळीं त्यांना मुक्त करीत आहे. आणि क्षमेची याचना करीत तो अपराधीच यावेळीं देवी, तुझ्या-समोर उभा आहे.

**वत्सलामाईः**—महाराज, यांत अपराध जर कांहीं असेल, तर तो आपण आपल्याशींच केलेला होता. क्षमा मी कोण करणार? शिवाय कृतकर्माचं पूर्ण परिमार्जन केल्यावर क्षमेचं कारणही नाहीं.

**कुमारसिंहः**—नाहीं, देवी! हें पश्चात्तापानं पोळलेलं हृदय क्षमेसाठींच केवळ नव्हे, तर तुझ्या अमृततुल्य प्रेमाला पात्र होण्यासाठीं तळमळत आहे. केवळ प्रेमानंच भरलेल्या तुझ्या हृदयांत याला जागा देऊन आपलंसं म्हणशील तरच हें हृदय शांत होणार आहे.

**वत्सलामाईः**—महाराज!

**कुमारसिंहः**—देवी! ही मस्तकाला झालेली जखम इथं येण्याला निमित्त म्हणून बळेंच करून घेतलेली जखम होती. पण खरी जखम दरबारांत तुझं दर्शन घडल, त्यावेळीं या हृदयाला झालेली आहे. शरिराची जखम हस्तस्पर्शानं बरी झाली. हृदयाची जखम हृदयानंच बरी होणारी आहे.

**वत्सलामाईः**—कोण, आमचे सम्राट् महामंडलेश्वरच बोलताहेत हे?

**कुमारसिंहः**—नाहीं. घायानं विद्ध झाल्यामुळं ज्याला हृदयाची जाणीव झाली, तो कुमार बोलत आहे.

**वत्सलामाईः**—भारतवर्षाच्या सिंहासनावरील ताप सहन करतां यावा, म्हणून ज्यांच्या मस्तकावर चतुःसमुद्रांच्या पवित्रोदकाचा मूर्धाभिषेक केला, तेच कुमार यावेळीं बोलत आहेत?

**कुमारसिंहः**—तो मूर्धाभिषेक व्यर्थ होता! या कुमाराला सिंहासना-वरील ताप सहन करवेना. राजरत्नं याला कांट्याप्रमाणं बोचूं लागलीं. राजवस्त्रांनीं भयंकर दाह होऊं लागला. म्हणून त्या सर्वांचा त्याग करुन केवळ सहृदय कुमार म्हणून तुझ्या हृदयाची याचना करण्यासाठीं तो आला आहे.

**वत्सलामाईः**—अखिल जगाला जीवन आणि प्रकाश देण्यासाठींच

ज्याची योजना त्या सूर्यनारायणानं मला ताप सहन करवत नाहीं, असं म्हणून महाराज, चालेल काय ?

**कुमारसिंहः**—देवी ! रजनीच्या प्रेमळ हृदयांत रजनीरमण चंद्ररूपानं सूर्याला निशासमयीं शीतळाई मिळते, म्हणूनच त्याला तो ताप दिवसां सहन करतां येतो. कुमाररूपानं या सम्राटाला तशी प्रेमळ हृदयाची शीतळाई नको काय ?

**वत्सलामाईः**—महाराजांची कविकल्पना मोठी सुंदर आहे, पण थोडी भ्रामक आहे. आजन्म तपत राहून सर्वव्यापी आकाशाचं हृदय जेव्हां सूर्य आपलंसं करतो, तेव्हांच त्याला आपण म्हणतां ती शीतळाई मिळत असेल. पण ताप सहन न करतां जर तो आपलं स्थान सोडून स्वैरपणानं धावरूं म्हणेल, तर त्याला शीतळाई तर मिळणार नाहींच, पण जगाचा अनर्थ मात्र होईल.

**कुमारसिंहः**—सूर्याप्रमाणं सर्वव्यापी आकाशांत आजन्म तपत रहाणं ? देवी ! किती कठोर–कठोर–खडतर व्रत हें ?

**वत्सलामाईः**—महाराज, भारतवर्षावर अंधकाराची केवढी भेसूर छाया पसरली आहे, ती परवां दरबारांत आणि आज इथं अनायासानं आपल्या नजरेस आली आहे. ती आपल्या प्रभावानं नाहींशी करून निरंतर प्रकाश पाडण्यासाठीं आपला जन्म असतां—

**कुमारसिंहः**—तो जन्म या कुमाराला कोणीं दिला ? बिसतंतूप्रमाणं ज्याच्या हृदयाचे धागे कोमल, चकोराप्रमाणं चंद्रकिरणांसारखा ज्याचा आहार शीतल, त्याला हा पंचाग्निसाधन करण्याचा जन्म कुणीं दिला ? देवी ! या कोमल हृदयाला तुझ्या कोमल हृदयाचाच स्पर्श सोसवेल. या चकोराला तुझ्या मुखचंद्राची चंद्रिकाच काय ती सहन करवेल.

**वत्सलामाईः**—हरहर ! भारतवर्षाच्या सिंहासनावर एक वीरवृत्तीचा साहसी नरश्रेष्ठ आहे, असं मला वाटत होतं. पण आतांच मोतिराम म्हणाला, त्याप्रमाणं अष्टभोगांत घोळवलेला एक नाजुक विलासी आमच्या सिंहासनावर विलासाच्या गुंगींत लोळतो आहे, हेंच खरं !

**कुमारसिंहः**—देवी ! देवी ! या कुमारासंबंधानं असा खोटा ग्रह करून घेऊं नकोस. ते राजविलासाचे अष्टभोग–ते अष्टभोग माझ्या नजरेसमोर

नकोत. सिंहासन केवळ सोसवत नाहीं इतकंच, पण त्या अष्टभोगांचा मला वीट—नुसता वीट आलेला आहे. कृत्रिम, खोट्या, मायावी स्वार्थ-लोलुपतेनं भरलेले ते अष्टभोग या कुमाराला विषाप्रमाणं कडू वाटतात. खऱ्या प्रेमाचा त्यांत लवलेशही नाहीं. त्या प्रेमाच्या अमृताचा झरा, देवी ! तुझ्या हृदयांत मला दिसला. त्याचं आकंठपान करून स्वर्गीय सुखाचा अनुभव घ्यावा म्हणून सर्वस्वाचा त्याग करून मी इकडं आलों. देवी ! या कृत्रिम, मायावी, दुष्ट जगाचा त्याग करून आपण निर्जन वनांत एकांतांत जाऊं, आणि अव्याजमनोहर अशा निसर्गाच्या संगतींत कोकिळेचं गायन ऐकत—

[पडद्यांत 'वीर—नू—वाली ! वीर—नू—वाली !' हा आलाप ऐकूं येतो.]

**वत्सलाबाई:**—ऐका ! भारतवर्षाचे नरेंद्र ! ऐका ! या वीरनवालीच्या मुखानं तुमची पट्टाभिषिक्त भारतराज्ञीच दुःखानं पीडित होऊन आक्रोश करीत आहे, ऐका ! परमेश्वरी योजनेनं तिचे खरे वाली आपण असतां, तिला या मायावी दुष्ट जगाच्या संगतींत बेलाशक तशीच टाकून देऊन, आपण मात्र अव्याजमनोहर निसर्गाच्या संगतींत कोकिळेचं गायन ऐकत स्वर्गीय सुखांत रममाण होणार ?

**कुमारसिंह:**—हें भेसूर स्वप्न जागेपणीं देखील माझ्या हात धुवून कसं पाठीस लागलं आहे !—कां मी जागा नसून स्वप्नांतच आहें ? ज्या चंद्रलोकाचा ठाव घेण्यासाठीं मी मंदाकिनींत उडी घेणार होतों, तो चंद्र-लोक प्रत्यक्ष माझ्यासमोर दिसत आहे ! तो त्याच्या वरचा मृगांक ! अहाहा ! मृगमदाचा काय सुवास सुटला आहे ! पृथ्वीवर अतिसूक्ष्म, अतिविरल अशा केवळ चंद्रिकेच्या रूपानं ज्याचा अल्पमात्र आस्वाद मिळतो, त्या दुर्लभ अमृताचा झोत ज्यांतून अखंड निघतो, ते हे स्वर्गीय नेत्र माझ्या अगदीं सन्निध आल्यामुळं, त्या अमृताचं मधुरपान आणि शीतस्नान मला होत आहे. हें जर स्वप्न असेल, तर तो आक्रोश या सुख-स्वप्नांतून मला निर्दयपणानं जागं करीत आहे. नाहीं ! नाहीं !—सुखस्वप्नाचा सुद्धां मला आस्वाद घेऊं देत नाहींत काय ?—नाहीं ! मी या स्वप्नांतून नाहीं जागा होणार ! देवी ! कृपासागर, प्रेमसागर, करुणासागर देवी !

तूच परवां दरबारांत या सागराचा प्रचंड प्रवाह घेऊन आलीस. या कुमारावर दया कर. दासानुदास होऊन हा कुमार तुझ्या चरणांवर—

**वत्सलामाई**:—खबरदार! अधमाधम राजा! तुला या मस्तकाची किंमत वाटत नसेल; पण गंगाजलाच्या अभिषेकानं पुनीत झालेलं हें भारत-वर्षाचं मस्तक अशा नीचपणान कुणापुढंही नमवून भ्रष्ट केलेलं भारत-वर्षाच्या कोणत्याही सुपुत्राला किंवा सुकन्येला सहन होणार नाहीं. यथा-न्याय लोकानुरंजन करून अखिल भारतवर्षाच्या प्रेमळ हृदयांतील स्पृहणीय स्थान प्राप्त करून घेण्याची परमेश्वरानं तुला सधी दिली असतां, ती तूं केवळ स्वार्थैकसुखलोलुपतेनं एका स्त्रीच्या चरणांच्या कर्दमांत लोटून देत आहेस. तूं राजा तर नाहींसच, पण मानवकोटींतील पुरुषनामालाही तूं पात्र नाहींस. असला सुखलोलुप प्राणी कोणत्याही पुरुषार्थाला नालायक आहे. नियोजित कर्तव्यापासून नामर्दपणानं दूर पळून जो पुरुष केवळ सुखलोलुपतेनं आपलं मस्तक एका स्त्रीच्या चरणीं लीन करतो, त्यासंबंधानं कोणाही स्त्रीला काय वाटणार? या वत्सलादेवीला तो नालायक—नादान—तिरस्करणीय—वाटतो. जा, तुझ्या मस्तकाचा किंवा कशाचाही स्पर्श माझ्या चरणांना देखील नको. तुझं दर्शन माझ्या नेत्रांना नको. तुझा विचार, तुझी कल्पना, माझ्या मनालाही नको ! [ जाते.

**कुमारसिंह**:—नालायक ! नादान ! तिरस्करणीय ! मनाला कल्पनाही नको ! कुमारा ! कठोर—खडतर व्रत स्वीकारून राजा होशील,—अलबत् ! मला राजा झालंच पाहिजे ! भारतवर्षाच्या कांटेरी सिंहासनावर बसून, तुला पंचाग्निसाधन केलंच पाहिजे ! आनंदा ! आनंदा !

**कुसुमस्कन्या**:—( प्रवेश करून ) काय महाराज ?

**कुमारसिंह**:—घोडा ! माझा घोडा कुठं आहे ? हा कुमार आपल्या राजधानीत सिंहासनावरचा राजा होण्यासाठीं जात आहे ! चूप ! याला क्षणाची फुरसत नाहीं. माझ्या कमलला सांग. आणि तूं, काकाजी तिला घेऊन या. [ जातात.

**धूमस्कन्या**:—काळ्या पाषाणांतलं गंगाजळ ! जटेंतून शुभ्र तेजानं बाहेर पडलं ! हा धवल चंद्रिकेचा प्रभाव काय ?

**कमला**:—( प्रवेश करून ) आनंदा, महाराज कुठं आहेत ?



**वत्सलामाई** ( रा. औंधकर ):—या वत्सलादेवीला तो नालायक-नादान तिरस्करणीय वाटतो. ( पृ० ६८. )

**खुषमस्कऱ्याः**—गंगा होय ? गेली सगरांचा उद्धार करायला !

**कमलाः**—आनंदा, ही थट्टेची वेळ नव्हे. तिकडं—

**खुषमस्कऱ्याः**—महाराज घोड्यावर बसून दौड करीतच राजधानी-कडं गेले !

**कमलाः**—काय, गेले ? तिकडं दीनदासजींना राजाज्ञेवरून कैद करून नेत आहेतरे !

**खुषमस्कऱ्याः**—हा सेनापतिद्रोह बरं ! भाईजींनीं मघाशींच इषारा दिला होता !

**कमलाः**—पण महाराज इथं असते—

**खुषमस्कऱ्याः**—महाराजांनीं आपणाला मागोमाग येण्याविषयीं आज्ञा केली आहे.

**कमलाः**—पण महाराज असे एकाएकीं एकटेच गेले !

**खुषमस्कऱ्याः**—ताईसाहेब, विचारालाच् चिंतेला वेळच नाहीं. चला !

[ जातात.

**मोतीरामः**—( प्रवेश करून ) भाईजी ! भाईजी ! काय भाईजी इथं नाहींत ? आमच्या भाईजींना राजाज्ञेनं पकडून कैद करून नेलं ! राजाबद्दल अपार निष्ठा बाळगून त्याच्यासाठीं प्राण देण्यास तयार असणारे आमचे भाईजी, त्यांना कैद करण्याची आज्ञा देणारा राजा कोणत्या धुंदींत आहे? याची विलासाची धुंदी अद्याप गेली नाहीं काय ? [ जातो. पडदा.

## दुसरा अंक समाप्त

# अंक ३ रा.

## प्रवेश पहिला.

[ भारतवर्षाची राजधानी. राजमहाल. प्रवेशद्वार.]

[**मायावती** दोन दासींसह. एका दासीजवळ तबकांत हार वगैरे. दुसरीजवळ फळफळावळ, मद्याच्या सुरया वगैरे. प्रवेशद्वारावर **रक्षक** उभा.]

**मायावतीः**—रक्षका ! महाराजांचा सत्कार करण्याचा पहिला मान पटकावणारी ही मायावतीच ना ? उगीच नाहीं ! महाराज छद्मवेषानं सायंसंध्येचा काळा बुरखा पांघरून अवचित एकटेच नगरांत आले, तरी पहिली वर्दी या मायावतीला ! अहर्निश काळाचे बदलते क्षणच या मायावतीनं महाराजांच्या पाळतीवर ठेवले होते ! कलावंतखातं कलाविहीन म्हणे ! अमात्य ! पहा आतां या मायावतीची कला ! चतुरिके, इंद्राचं नंदनवन सर्व प्रकारच्या भोग्यवस्तूंनीं तिन्हीत्रिकाळ सज्ज असतं, असं म्हणतात. महाराजांचं क्रीडामंदीर तसंच ठेवलं आहे ना ?

**चतुरिकाः**—बाईसाहेब, आपल्या सिद्धतेला तिन्ही त्रिकाळ हा शब्द उणा पडेल ! काल जसा अखंड, तसा आपल्या सिद्धतेलाही खंड नाहीं ! सेनापतिसाहेब नेहमीं म्हणत असतात, तें उगाच नव्हे ! कीं नंदनवन स्वर्गात असेल, पण स्वर्गच मुळीं आमच्या मायावतींच्या परिवेषांत आहे !

**मायावतीः**—शाबास ! अशा चतुरिका महाराजांच्या क्रीडामंदिरांत असून कलावंतखातं म्हणे कलाविहीन ! रक्षका, प्रतिहारीला यायला विलंब कां बरं लागला ? महाराजांना सांगायचा संदेश तिला तूं बरोबर सांगितलास ना ?

**रक्षक**—होय बाईसाहेब. पण तिकडं राजपुरोहित यज्ञशाळेंत महाराजांना शुभाशीर्वाद देण्यासाठीं आले असून, त्यांची वर्दी आपल्या पूर्वी गेलेली आहे.

**मायावतीः**—पुरोहितांच्या शुभाशीर्वादाची का वेळ आहे ही ? या जरठ तपस्व्यांना काळवेळ कांहीं समजत नाहीं. महाराजांचं नगरांत आग-

मन दिवसाच्या खडतर वेळेला झालेलं नसून, निशेच्या या विलासवेळेला झालेलं आहे ! ही वेळ म्हणावं मायावतीची आहे ! तारकांचे कटाक्ष आणि अप्सरांचे सुस्वर आलाप ऐकायचे टाकून जरठांचे वेदघोष या वेळीं कोण ऐकणार आहे ? निशेंतील कटाक्षांच्या श्रमानं तारकांचे नेत्र मिटले आणि तुमच्या त्या तापसी सूर्याला दाही दिशा मोकळ्या झाल्या, म्हणजे मग म्हणावं तुमचे खडतर वेदघोष खुशाल चालू द्यात ! कोणतीही कर्मयोजना कालानुरूप असावी लागते. ज्यानं त्यानं आपापली कालमर्यादा संभाळावी !

**प्रतिहारीः**—( प्रवेश करून ) रक्षका, मायावतीला निरोप दे ! त्यांचा सत्कार घेण्याची महाराजांची मर्जी नाहीं !

[ **रक्षक मायावतीला** जाण्याचा मार्ग दाखवितो. खण्डिता होऊन फणकाऱ्यानें सर्वांकडे पहात ती जाते. इतक्यांत द्वारावर **अमात्यांची** स्वारी होऊन त्यांचे दृष्टीसमोरून तिला जावें लागतें.]

**प्रतिहारीः**—( अमात्य आलेले न पाहून रक्षकास ) रक्षका, अमात्यांकडं दूताला जाऊन बराच वेळ झाला, नाहीं ? महाराज त्यांचे भेटीविषयीं अगदीं आतुर झाले आहेत.

**रक्षकः**—हे आलेच अमात्य. ( मुजरा )

**प्रतिहारीः**—यावं अमात्य. ( मुजरा ) महाराज आपली मार्गप्रतीक्षाच करीत आहेत.

[ **प्रतिहारी** मार्ग दाखविते. **अमात्य** तिच्या मागून जातात.]

[ देखावा बदलून राजमहाल.—**सम्राट् कुमारसिंह** एकटेच.]

**कुमारसिंहः**—राजा ? कुमारा ! तुला राजा व्हावयाचं आहे ? तुला राजा झालं पाहिजे ? होय, तुला राजाच झालं पाहिजे !—तुला—राजा झालंच पाहिजे ! विलासांत धुंद ? अंः ! या लोकनिंदेचं मनाला अवघड असं कांहींच वाटल नाहीं. विलासांचा या कुमाराला मुळीं वीटच आला होता. लौकिकांत काय तो त्यांचा त्याग व्हायचा होता इतकंच. पण नालायक ! —नादान !—तिरस्करणीय ! प्रेमासाठीं तळमळणाऱ्या जीवा ! ही तिरस्काराची आंच—कशी सहन करवेल !—पण—मग तुझ्यांतील नालायकी—हिणकसपणा-जळून खाक व्हायला नको का ?—तुला—ही सहन केलीच पाहिजे ! हृदयाची उफलून लाही लाही करणारी असली तरी तुला—ती सहन केलीच पाहिजे !

याच दिव्यानं तावून सुलाखून खऱ्या राजरूपानं जेव्हां तूं बाहेर निघशील, तेव्हांच–त्या कल्पनेंत–त्या विचारांत तुला थारा मिळेल. हृदयांत ? किती विशाल–किती व्यापक हृदय तें ! तिरस्काराला पात्र होईन, हा मनाला सतत जागता कांच ठेवून, त्याच आंचीनं सूर्यासारखा निरंतर तपत राहून अखिल भारतवर्षाच्या हृदयाइतकं आपलं हृदय विशाळशील, तेव्हांच–तेव्हांच कदाचित्— [ **प्रतिहारी** व **अमात्य** येतात.

**प्रतिहारी**:—महाराजांच्या दर्शनासाठीं आज्ञेवरून हे अमात्य आले आहेत.

**अमात्य**:—महामंडलेश्वरांचा जयजयकार असो ! सम्राटांचं कुशल आहेना ?

**कुमारसिंह**:—यावं अमात्य. आपणांसारख्या गुरुजनांच्या आशीर्वादानं कुशल आहे. प्रतिहारी, सर्व राबता बंद ठेव. [ **प्रतिहारी** जाते.] अमात्य, स्वामी विश्वानंदजींना मुक्त करण्याबद्दलची आज्ञा इथं येतांक्षणींच आपणांकडं पाठविली, ती मिळाली ना !

**अमात्य**:—होय. आणि तीप्रमाणं तावडतोब त्यांच्या मुक्ततेची तजवीजही केली आहे. मीच होऊन महाराजांना ही सल्ला देणार होतों. महाराजांनीं महामंडलेश्वरांना उचित तेंच केलं.

**कुमारसिंह**:—परवांच्या दरबारांत अकस्मात् प्रगट झालेली ती वीरनूवाली कोण, याचा कांहीं शोध अमात्यांनीं केला आहे काय ?

**अमात्य**:—ती एक शुद्ध वेडी आहे. तिच्यामुळं महाराजांनीं आपलं मन अस्वस्थ होऊं देऊं नये.

**कुमारसिंह**:—वेडी ? अमात्यांना ती शुद्ध वेडी आहेसं वाटतं ? —असेल, असेल. पण अमात्य, तें वेड सामान्य–केवळ उपेक्षणीय दिसत नाहीं. दरबारांतील भल्याभल्यांना त्याच्या दर्शनानं धडकी भरली, नाहीं ? सामान्य प्रजेला त्याबद्दल काय वाटतं, तें त्यावेळीं अमात्यांनीं लक्षांत घेतलंच असेल.

**अमात्य**:—तिला पकडण्याबद्दल सेनापति मुद्रांकित राजाज्ञा मागत होते. महाराजांची मर्जी असेल, तर ती आतांच देतां येईल.

**कुमारसिंह**:—तिला पकडायची ? पकडायची काय म्हणून ? . .

**अमात्यः**—तिनं शांततेच्या दरबारचा भंग केला, या अपराधाबद्दल तिला पकडावी, असं सेनापतींना वाटतं.

**कुमारसिंहः**—पण अमात्यांना काय वाटतं ? अमात्य, या अभिषिक्त मस्तकाचा सर्व भार आपणांवर टाकून, हा कुमारसिंह आपल्या मांडीवर शीतळ अभिषेकानंतरची सुखनिद्रा घेत पडला होता. कांहीं काळ त्याला त्या निद्रेंत केवळ स्वर्गीय स्वप्नंच पडत होतीं. पण दरबारांत त्या वीरन-वालीचं दर्शन घडलं आणि तिचा तो आलाप ऐकला, तेव्हांपासून स्वर्गीय स्वप्नांचा सर्व देखावा पार बदलून जाऊन, भेसूर देखावे आणि हृदयभेदक आलाप यांनीं या कुमारसिंहाची स्वर्गीय सुखनिद्रा भगून गेली. तसल्या निद्रेचं या भारतवर्षाच्या राजाला आतां भयच वाटूं लागलं आहे ! ते आलाप आणि ते देखावे आतां याला झोंप घेऊं देतील, असं वाटत नाहीं !

**अमात्यः**—परवांच्या दरबारामुळं महाराजांचं अस्वस्थ झालेलं मन ताईसाहेबांकडं गेल्यानं शांत होईल, असं वाटलं होतं.

**कुमारसिंहः**—ब्रह्महत्या पाठीस लागली, कीं कुठही जा, शांति नाहीं ! या पौराणिक गोष्टीचा साक्षात्कार अमात्य, माणसाला केव्हांना केव्हां तरी आल्यावांचून रहात नाहीं.

**अमात्यः**—पण महाराजांच्या हातून—

**कुमारसिंहः**—झोंप ! राजाची झोंप म्हणजेच त्याची ब्रह्महत्या ! समी-करण समजायला अवघड आहे. प्रचीतीवांचून समजायचं नाहीं !

**अमात्यः**—महाराजांनीं या अमात्यावर पूर्ववत् सर्व भार टाकून शांत असावं. त्या वीरनवालीचा सर्व शोध काढून, तिचा आलाप—फार काय, तिचं नांवसुद्धां महाराजांच्या कानांवर येणार नाहीं, अशी तजवीज करतों.

**कुमारसिंहः**—नांवसुद्धां कानावर येणार नाहीं, अशी तजवीज ? उलट तिचं पुनर्दर्शन घडावं, अशी तर आमची इच्छा आहे !—बरं, तें असूंद्या. युद्धाप्रीत्यर्थ प्रजेवर नवीन कर बसवावे लागले ?

**अमात्यः**—होय महाराज. या युद्धापायीं भारतवर्षाचं सर्व द्रव्यभांडार रितं झालं. इतकंच नव्हे, तर प्रतिपच्चंद्ररेखेप्रमाणं निरंतर वर्धमान असणारं तें भांडार ऋणाच्या राहूनं ग्रासून गेलं आहे. प्रजेनं कराचं दान दिल्या-वांचून तें ग्रहण सुटण्याची आशा नाहीं !

**कुमारसिंह**:—प्रजेनं आजपर्यंत आपली अन्नसामुग्री, आपलीं खिल्लारं इतकंच नव्हे, तर आपले कर्ते पुरुष युद्धापायीं दिले, हें दान थोडंथोडकं आहे काय ? त्यांतून कर्ते पुरुष आणि खिल्लारं नाहींशीं झाल्यामुळं कृषिकर्म बुडून, धनधान्याचा दुष्काळ पडला ! या दुष्काळांत प्रजेनं कर कोठून द्याव !

**अमात्य**:—महाराजांचं वस्तुस्थितीचं ज्ञान यथार्थ आहे. पण—

**कुमारसिंह**:—शत्रूपासून युद्धाची भरपूर खंडणी भारतवर्षानं घेतली नाहीं काय ?

**अमात्य**:—होय. पण ती विजयस्तंभाभोंवतालचे दुर्ग, कोट बांधून उद्यतदंड राहण्यासाठीं सेनापति व सरदार-मंडळ यांनीं राखून ठेविली आहे.

**कुमारसिंह**:—होय ! साम्राज्याच्या रक्षणासाठीं दुर्ग, कोट लागत असतात खरे ! पण हे निर्जीव दगडाचे दुर्ग–हे निष्प्रेम फत्तरांचे कोट फार तर भाडोत्री सैनिकांच्या उसन्या आवेशानं उभारल्या जागेचं रक्षण उभारल्या काळापर्यंत करतील. तेच एकनिष्ठ, प्रेमळ प्रजेच्या छातीचे जिवंत दुर्ग, अक्षय्य आणि अभंग असे कोट, कुठंही आणि कोणत्याही प्रसंगीं साम्राज्याचं रक्षण निरंतर करतील, नाहीं ?

**अमात्य**:—( खालीं मान घालून ) महाराज सत्य तेंच बोलत आहेत.

**कुमारसिंह**:—मग प्रजेला असह्य करानं पिळून काढून तिच्यांतील जीवनरस आटवूं नका. तिला निःसत्त्व आणि निष्प्रेम करूं नका. खंडणीचा पैसा दगडावर किंवा भाडोत्री सैनिकांवर पाण्यासारखा ओतीत राहिलांत तरी त्यांच्यांत तो जीवनरस किंवा तें प्रेम कधींही येणार नाहीं !

**अमात्य**:—महाराजांचे हे विचार मंत्रिसभेंत सेनापतिआदि सरदार-मंडळाला कळवून, त्यांचा—

**कुमारसिंह**:—सल्ला ? अवश्य–अवश्य घ्या. तेही प्रजेप्रमाणंच साम्राज्याचे जिवंत आधारस्तंभ आहेत. पण प्रजेवर युद्धाप्रीत्यर्थ लादलेले नवीन कर काढून टाका. यापूर्वींच जुलमानं जे वसूल केले असतील, ते परत करा. युद्धाची खंडणी युद्धखर्चाला पुरून उरण्यासारखी आहे. तिच्यांतून प्रजेच्या बेचिराख झालेल्या कृषिकर्माला उत्तेजन द्या. या योगानं तिच्यांतील जीवनरस जोमदार राहून जो प्रेमाचा सागर उचंबळून येईल, तो

कोणत्याही शत्रूला लाटेबरोबर बाहेर फेंकून तरी देईल किंवा आत्मसात् तरी करील !

**अमात्य:**—महाराज–बोलतों, क्षमा असावी–पण महाराजांची खरो-खरच अशी–आज्ञा–कीं नुसती इच्छा आहे ?

**कुमारसिंह:**—अमात्य ! आपल्या मांडीवर झोप घेत असलेलं हें बालक जागं होऊन बाळबुद्धीनं कांहीं बडबडतं आहे, असं जर आपणाला वाटत असेल—

**अमात्य:**—छे:, छे:, महाराज ! माझ्या बोलण्याचा तसा अर्थ—

**कुमारसिंह:**—किंवा ही जागृतीच नसून केवळ निद्राभ्रम असेल—

**अमात्य:**—महाराजांनीं या वृद्ध अमात्यावर असा राग करूं नये.

**कुमारसिंह:**—राग ? अमात्य, आपण या कुमाराचं आजपर्यंत पितृवत् पालन केलंत. आपणांवर राग ?

**अमात्य:**—मग महाराजांची ही अशी इच्छा असेल, तर आकाशाला गवसणी घालूं पाहण्यासारखीच ही इच्छा आहे.

**कुमारसिंह:**—होय, भ्रमानं केवळ देहबुद्धिइतका लहानाळलेला हा राजा आपलं हृदय विशाळून त्यानं भारतवर्षाच्या आकाशाला तो गवसणी-च घालूं पहात आहे.

**अमात्य:**—महाराजांची ही इच्छा उदात्त, सुंदर आणि सर्वतोपरी स्पृहणीय आहे. पण तीच जर आज्ञा होईल, तर ती मात्र या अमात्याला अत्यंत दुष्कर वाटते.

**कुमारसिंह:**—दुष्कर ? मग महाराजांनीं सर्व भार अमात्यांवर टाका-यचा तो काय ?

**अमात्य:**—क्षमा असावी. हा भार या अमात्याला दुःसह आहे. गोकुळांत बाळकृष्णानं वृद्ध गोपांना इंद्राच्या यज्ञाऐवजीं गिरियज्ञ करायला सांगितला, त्यावेळीं त्या गोपांना देखील ती आज्ञा दुष्कर वाटली नसेल, इतकी ही या आमात्याला दुष्कर वाटते.

**कुमारसिंह:**—होय ! त्यावेळीं इंद्रादिकांच्या कोपापासून गोपांचं रक्षण करण्यासाठीं श्रीकृष्णाच्या बालमूर्तीला गोवर्धन पर्वत उचलावा लागला ! अमात्य, आपण म्हणतां तें खरं आहे. इच्छा सुंदर–आज्ञा दुष्कर ! प्रजेच्या

कराची तूट भरून काढण्यासाठीं सरदार-मंडळाच्या यज्ञाची आहुति म्हणून काढून ठेवलेल्या खंडणीच्या पैशाला हात लावावा लागेल! अमात्य, त्यापूर्वी या भारतवर्षाच्या सम्राटाची क्रीडामंदिरासारखीं जीं जीं म्हणून विलासस्थानं असतील, तीं प्रथम बंद करून, त्यांचा पैसा तिकडं लावा. राष्ट्रांतील कलांचं पोषण आणि संवर्धन इतक्या पुरतंच कलावंतखातं कायम ठेवून, बाकीचीं सर्व या क्षणापासून बंद ! भारतवर्षाच्या या राजाचे अष्टभोगादि सर्व राजोपचार, सर्व विलास बंद ! प्रजेच अनुरंजन हाच राजाचा विलास! तेच राजाचे अष्टभोग! गिरियज्ञाला राजानंच अशी सुरवात केल्यानं अमात्य, आपलं कार्य सुकर होणार नाहीं काय? अमात्य, आजपर्यंत झोंपेसाठीं आपल्या मांडीचा आधार या कुमाराला मिळाला. जागृतीसाठीं आपल्या हाताचा आधार जर या सम्राटाला मिळेल—

**अमात्यः**—महाराज, आपला हा नवजीवनाचा संचार कसा आणि कोठून आला असेल तो असो; पण त्याच्या या आकस्मिक प्रकंपनानं आपला हा वृद्ध अमात्याचा जुनाट वटवृक्ष थरथरूं लागला आहे. तो स्वतः अति जुनाट झाला असून आतां तो केवळ आपल्या पारंब्यांच्या म्हणजे या सरदार-मंडळाच्या आधारावर उभा आहे. त्या पारंब्यांनाच आपण धक्का लावाल कीं काय—परशूसाठीं याचाच दांडा घेऊन आपण त्यांचा उच्छेद करतां कीं काय,—महाराज, तसं झालं तर हा जुनाट वृक्षच उभा राहूं शकणार नाहीं. मग हा उन्मळणारा वृक्ष आपणाला काय आधार देईल ?

**कुमारसिंहः**—वृद्ध अमात्यांची ही भीतीच निराधार आहे. आम्ही परशू हातांत धरून त्या पारंब्यांचा—आपल्या सरदार-मंडळाचा—उच्छेद करूं इच्छित नाहीं. अर्थात् त्याला आपला दांडाही नको. सर्व प्रकारच्या श्रेयस्कर वृक्षवेलींनीं आपणांबरोबरच विस्तारानं वाढावं, एवढी मात्र त्या वटवृक्षाच्या पारंब्यांनीं सदिच्छा धरावी ! वटवृक्ष हें सर्वव्यापी जगदात्म्याचं एक अधिष्ठान आहे, हें त्या पारंब्यांनीं विसरूं नये !

**अमात्यः**—महाराज, आपल्या लोकोत्तर नवजीवनाचा हा कल्पनातीत विकास पाहून या वृद्धाची मति स्तंभित झाली आहे. उपजतांच सूर्यबिंबाचा ग्रास करूं पाहणाऱ्या मरुत्सुत मारुतीचंच उड्डाण आहे हें !. तें

या वृद्धाला कसं झेंपावं ? या जीर्ण झालेल्या खोडाला हें नवजीवनाच रसायन सोसवेल–का भाजून काढील ? महाराज, या वृद्धाला याचा शांतपणानं विचार करूं द्या. याला आज्ञा द्या, आणि आपणही आतां थोडी विश्रांति घ्या.

**कुमारसिंहः**—( निःश्वास टाकून हलकेच ) विश्रांति ?—विश्रांतीला स्थान ?—त्यासाठींच हा जीव तळमळत आहे !

**अमात्यः**—महाराज, साऱ्या भारतवर्षालाही तीच तळमळ लागून राहिली आहे. आमच्या महाराजांना आतां अनुरूप विश्रांतीचं स्थान अवश्य पाहिजे. अनेक देशच्या राजकुमारी महामंडलेश्वरांच्या प्राप्तीसाठीं हातांत माळ घेऊन तयार आहेत. दरबारचा समारंभ पार पडल्यानंतर महाराज आपला मनोदय जाहीर करणार होते—

**कुमारसिंहः**—मग तो समारंभ पार पडला काय ? शिवाय, या नादान–अमात्य, शांततेच्या दरबारचा त्याप्रमाणंच हाही मुहूर्त अद्याप सांपडला नाहीं ! यावं अमात्य. आपणासारख्या वृद्ध जनांना या हक्काच्या विश्रांतीच्या वेळीं आम्हीं फार तसदी दिली. प्रतिहारी, अमात्यांना मार्ग दाखीव.

[ **अमात्य** मुजरा करून महाराजांकडे पहात **प्रतिहारी**बरोबर जातात.]

**कुमारसिंहः**—मला राजा व्हायचं, म्हणजे या कुमारानं केवळ स्वसुख–पराङ्मुखतेचं खडतर व्रत स्वीकारून भागणार नाहीं. गोवर्धन पर्वत उचलावे लागतील ! ज्ञानवृद्ध अमात्यांनीं या महामंडलेश्वराला दिव्य दृष्टि देऊनच त्याच्या जबाबदारीचं हें विराटस्वरूप दाखवलं. मी राजा झालों, म्हणजे इंद्राप्रमाणं वतनदार असलेल्या माझ्या राज्यांतील कित्येक दैवतांचा क्षोभ होणार आहे ! आणि त्या क्षोभापासून प्रजेचं रक्षण करण्यासाठीं याला श्रीकृष्णाप्रमाणं गोवर्धन पर्वत उचलावे लागणार ! कुमारसिंहा ! तुझ्या करांगुलींत इतकं प्रचंड सामर्थ्य कुठून येईल ! श्रीकृष्ण देवावतार होते ?—होय, पण मानवदेहधारीच होते ? मानवाला शक्य तेंच त्यांनीं केलं असेलना ? त्यांना गोवर्धन पर्वत उचलणं कसं शक्य झालं ?—आबालवृद्ध गोपगोपींच्या प्रेमाचं अवसान–जें प्रेम गोकुळांत राधारूपानं एकवटून संचरत होतं, त्या प्रेमाचं अवसान–पण या नालायक, नादान, तिरस्करणीय कुमाराला तें अवसान कसं मिळावं ?

**प्रतिहारीः**–(प्रवेश करून) महाराज, राजभगिनी कमलादेवी ताईसाहेब–

कुमारसिंहः—काय, आमची कमलताई ? आणि आनंदा, काकाजी–

प्रतिहारीः—होय, ताईसाहेबांबरोबर तेही आले आहेत.

कुमारसिंहः—जा, त्या सर्वांना इकडं घेऊन ये. [ प्रतिहारी जाते.

कुमारसिंहः—तिरस्करणीय कुमारा ! सर्व प्रकारच्या समर्थ साधन-संपतीनं संपन्न असं हें आयुष्य आजपर्यंत तूं व्यर्थ वेंचून केवळ नादान बनलास !

[ कमलादेवी, खुषमस्कऱ्या, काकाजी येतात.]

कुमारसिंहः—ताई ! आनंदा ! काकाजी ! हा कुमार पश्चात्तापानं पोळून, तुम्हां सुहृदांची क्षमा मागत आहे ! झोंप घेत असलेल्या या राजाला तुम्ही प्रेमाच्या कळकळीनं जागं करण्याचा किती वेळां तरी प्रयत्न केलात; पण सुखस्वप्नांत दंग राहण्यासाठीं हा आजपर्यंत झोंपेंतच राहिला. परमेश्वरानं याला समर्थ अशा राजकुलांत जन्माला घातलं. जोमदार जीवनरसानं युक्त असं शरीर, उज्ज्वल बुद्धिमत्ता, उत्कट भावना यांचा भरपूर सांठा देऊन त्यांच्यावर योग्य ते सस्कारही चढवले. जिवाला जीव देणाऱ्या तुम्हांसारख्या सुहृदांची जोड दिली. आणि प्रजामंगलाचं सुनिश्चित कार्य करण्यासाठीं भारतवर्षाचं अफाट साम्राज्य दिलं ! पण ही सर्व साधनसंपत्ति केवळ सुख-स्वप्नाच्या झोंपेंत या कर्मचांडाळ कुमारानं आजपर्यंत वांया दवडल्यावर आतां एका दैवयोगामुळं–सुदैव कीं दुर्दैव देव जाणे !–पण त्या दैव-योगामुळं एका क्षणाच्या तीव्र अंजनानं–अंजन तीव्र, पण तें ज्या करां-गुलीन घातलं ती मात्र अमृताची !–त्या अंजनानं झटकन् झटका बसून जागा होऊन पाहातों, तों हा राजा केवळ नालायक–नादान–तिरस्करणीय ! ताई, हा नालायक राजा आतां जागा होऊन याच्या हातून त्याचं प्रजा-मंगलाचं कार्य होईल काय ? ज्ञानवृद्ध अमात्यांनीं त्या कार्याचं स्वरूप किती विराट आहे, तें आतांच दाखवलं. श्रीकृष्णाप्रमाणं गोवर्धन पर्वत याला उचलावे लागतील ! या नादान राजाच्या करांगुलींत तें सामर्थ्य कुठून येईल ?

कमलाः—कुमार ! कुमार ! अशी निष्कारण आत्मनिंदा केलेली या तुमच्या जिवलगांना ऐकवत नाहीं. शिवाय, परवां माईनं आपली साहसी वृत्ति पाहून जे उद्गार काढले—

कुमारसिंहः—काय ? देवींनीं काय उद्गार काढले ?

**कमलाः**—'महाराजांच्या राजस मनाला योग्य असं ध्येय नाहीं! पुरुषार्थाला वाव नाहीं! असल्या मनाला योग्य असं उज्ज्वल ध्येय मिळालं, तर कमल, तुला सांगून ठेवतें, कीं हीच साहसी वृत्ति परमपुरुषार्थाची जन्मदात्री होईल.' असं—

**कुमारसिंहः**—काय ? असं देवींना वाटलं ? देवींना असं वाटलं ? कुमारा ! तुला आशा–निदान तुला निराश होण्याचं तरी कारण नाहीं !–देवींना असं वाटलं ! एक वेळ तरी असं वाटलं !–ताई, या राजानं आपलं कार्य करायला इतक्यांतच एक पाऊल टाकलेलं आहे ! तुम्हां जिवलगांचा याला आधार आहेच आहे ! पण देवींनाही असं वाटलं ?—येऊं द्यात ! गोवर्धन पर्वत उचलण्याचे प्रसंग—येऊं द्यात ! आनंदा ! काकाजी ! स्वामीजी अदृश्य झाले, असा लोकांचा ग्रह. पण ते या झोंपेंतल्या राजाच्या कैदेंत होते ! जागा होतांच त्यांना मुक्त करण्याची राजाज्ञा त्यानं आतांच दिली आहे.

**कमलाः**—मग महाराज, तशीच दुसरी राजाज्ञा मागण्यासाठीं ही आपली कमल धांवत आली आहे! इकडं स्वामीजींना आपण मुक्त केलंत, पण दीनदासजींना तिकडं कैद करून नेलं !

**कुमारसिंहः**—काय ? दीनदासजींना कैद करून नेलं ? कुणाच्या आज्ञेनं?

**खुषमस्कऱ्याः**—झोंपेंतल्या राजाच्या !

**कुमारसिंहः**—बरोबर आहे ! पण त्यांना केव्हां कैद केलं ?

**काकाजीः**—महाराज इकडं यायला निघाले असतील नसतील, तोंच तिकडं सेनापतींचे स्वार राजाज्ञा घेऊन आले. आणि त्यांनीं संजीवनालयांतच त्यांना कैद केलं !

**कुमारसिंहः**—या झोंपेंतल्या राजाच्या राजाज्ञा साऱ्या भारतवर्षभर खोट्या नाण्याप्रमाणं पसरल्या असतील ! तीं सर्व नाणीं खोटीं आहेत, असं मला आतां जाहीर केलं पाहिजे.

**कमलाः**—मग महाराज, हें नाणं खोटं आहे, हें जाहीर करण्याचं काम आपण आपल्या या कमलकडं द्यावं, अशी इची प्रार्थना आहे.

**कुमारसिंहः**—बेशक !–कमल ! तुझ्या शब्दांना वेगळाच नाद ? हृदयाला हृदयाची साक्ष पटवणारा ?–तुझ्याही हृदयांतील सारंगी कंपित

झाली होय? त्या रात्रीं चंद्रिकेंत कोमजलेलं कमल–थोडं? कमल! ताई! आजपर्यंत या झोंपेंतल्या कुमारानं तुझ्याकडंही लक्ष दिलं नव्हतं. प्रेमासाठीं? प्रेमासाठीं या कुमारसिंहाच्या भारतवर्षांत कुणालाही पूर्ण मुभा! जा, ही राजमुद्रा घेऊन ती झोंपेंतली राजाज्ञा खोटी म्हणून बेलाशक जाहीर कर! काकाजी, तुम्ही आमच्या कमलबरोबर असा.

**काकाजीः**—आज्ञा सरकार. [ **कमलादेवी** व **काकाजी** जातात.

**कुमारसिंहः**—आनंदा! देवींना काय वाटलं?

**खुपमस्कन्याः**—पुरुष हा अर्धनारीनटेश्वर आहे, असं वाटलं!

[ पडदा.

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळः**—राजधानी–राजमार्ग. **हेराध्यक्ष** व **छाया** येतात. ]

**हेराध्यक्षः**—छे छे छे छे छेः! या बातम्यांनीं तर प्रभे, आपण जेर झालों बुवा! महाराजांचं आगमन काल सायंकाळीं राजधानींत झाल मात्र! दाही दिशांकडून या हेराध्यक्षावर नुसता वर्षाव चालला आहे! सूर्याला सहस्र कर, इंद्राला सहस्र नेत्र, शेषाला सहस्र जिव्हा तसे या हेराध्यक्षाला सहस्र कर्ण–अगदीं केसागणिक असायला पाहिजे होते!

**छायाः**—त्या स्वर्गांतल्या गोष्टी इथं कशा मिळाव्यात? इथले गुण इथं. धनुर्धराला लांब हात, जासूदाला लांब पाय, हुक्याला नळी आणि मारुतीला शेंपूट असेल तितकं लांब हवंच! लंकेला वेढा घालावयाचा असतो! झाल म्हटलं तर, बगळ्याला लांब मान–हो, या तीरावर बसून त्या ऽऽतीरावरचा मासा गट्ट करतां आला पाहिजे! तसंच हेराध्यक्षाला—

**हेराध्यक्षः**—लांब कान! थांबलीस कां? ते तरी दे! मग गाढव बनलों तरी हरकत नाहीं! निदान या बातम्यांचा भार तरी वाहतां येईल. काय बातम्या! महाराजांच्या हालचाली, ताईसाहेबांच्या हालचाली, दीनदासाची कैद आणि त्या कैदेमुळं लोकांत उडालेली खळबळ–किती म्हणून बातम्या सांगाव्या?

**छायाः**—पण त्या इथंच काय सांगत बसलांत? अमात्यांना सांगा.

**हेराध्यक्षः**—अग, तिथं गेलों तों काय, भार हलका व्हायच्या ऐवजीं भरींत भरच पडली! तो धीरगंभीर सागरसुद्धां आंतून वडवानळ जागा व्हावा, तसा आपल्याशींच व्यग्र दिसला! त्यांनीं या सर्व बातम्या सेनापतींच्या कानांवर घालण्याची मला आज्ञा केली आहे.

**छायाः**—मग कानावर घाला नि मोकळे व्हा. एवढी चिंता कां करतां?

**हेराध्यक्षः**—चिंता करूं नको तर काय करूं? महाराजांच्या कालच्या सायंकाळच्या आगमनापासून या बातम्यांच्या वर्षावाला सुरवात झाली आहे. आणि सायंकाळचा पाहुणा वस्तीला राहतो! तशी जर या वर्षावानं वसती केली, तर मात्र या हेराध्यक्षाची धडगत नाहीं! [जातात.

---

## प्रवेश तिसरा.

[**स्थळः**—राजधानी. **सेनानायक उग्रसेन** यांचा महाल. **सेनानायक** व सरदार-मंडळाचे प्रतिनिधि **शुंभसेन** व **सज्जनसिंग.**]

**सेनानायकः**—काय म्हणतां, काल अगदीं अपरात्रींच तुम्हाला बोलावून नेऊन अमात्यांनीं हें सांगितलं?

**शुंभसेनः**—होय, क्रीडामंदिरांत सम्राटांच्या सत्कारासाठीं मायावतींनीं जी अपूर्व सिद्धता केली होती, तिथं माध्वी सुरेचा आस्वाद घेऊन गुर्जरीय नर्तकींच्या रासांत आम्ही अगदीं दंग होतों, तों इतक्यांत अमात्यांकडून दूत आला! आपणही सेनापतीसाहेब त्यावेळीं मंदिरांत—

**सेनानायकः**—होय शुंभसेन, काल मायावतींचा सत्कार सम्राटांनीं स्वीकारण्याचं नाकारलं, त्यामुळं खण्डिता झाल्यानं त्यांचं चित्त फार अस्वस्थ झालं होतं. म्हणून आम्ही त्यांचं समाधान करीत होतों. पण शुंभसेन, सम्राटांच्या मनानं हें भलतंच काय घेतलं आहे? चुकलंच तें! तारुण्याचे पंख फुटले, कीं पुरुषाचं मन गृहिणीच्या पिंजऱ्यांत वेळींच अडकवलं पाहिजे. पट्टराणीशिवाय अमात्यांनीं महाराजांना पट्टाभिषेकच करायचा नव्हता.

**सज्जनसिंगः**—हो, पण महाराजांनींच ती गोष्ट त्यावेळीं नाकारली.

**सेनानायकः**—बरं, पण सज्जनसिंग, सम्राटांचं मन अहर्निश रममाण

व्हावं, म्हणून त्यांच्या चित्तविनोदासाठीं नानाप्रकारचे भोग, विलास, क्रीडा निर्माण करून त्या अखंड सिद्ध ठेवण्यांत आम्हीं काय कमीपणा केला होता ? साम्राज्याचे सर्व प्रकारचे क्लेश, आयास अमात्यांनीं आणि आम्ही आपल्या शिरावर घेऊन, सम्राटांना त्याचा यत्किंचितही ताप भासूं नये, अशाविषयीं आम्ही दक्षता राखीत असतां,-हें अफाट साम्राज्य त्यांच्या मनोविनोदासाठीं-केवळ सुखासाठीं आहे ! असं असून हें विपरीत कुठून त्यांच्या डोक्यांत शिरलं ? काय म्हणतां ? सम्राटांच्या या सर्व इच्छा सरदार-मंडळाच्या महामंत्रीसभेंत विचारासाठीं सादर करण्याचं अमात्यांनीं ठरवलं आहे. येऊं द्यात ! सरदार-मंडळ खंडणीचा पैसा हातचा जाऊं देईल ? काय हो, शुंभसेन ! काय सज्जनसिंग ? महायुद्धांत विजय कोणीं मिळविला आहे ? साम्राज्याचं रक्षण करण्याची जबाबदारी कोणावर आहे ? --पण सम्राटांच्या डोक्यांत हें कुठून आलं ?

**सज्जनसिंगः**—परवांच्या दरबारपासून—

**सेनानायकः**—दरबार ! तो दरबार आठवला कीं,-काय करूं ? मनां-तल्या मनांत मुठी आवळून त्यावेळीं दांतओंठ खावे लागले ! रणांगणा-वर शस्त्र चालवतां चालवतां शत्रूकडून पराभव झालेला पुरवता ! त्या दीनदासाला पकडलं,-पण काय ? त्यामुळं लोक चंडवातासारखे खवळले आहेत म्हणे ! सरदार-मंडळाच्या क्षात्रतेजाचा दराराच पार नाहींसा झाला-मेला काय ? तुम्हीं आम्हीं महायुद्धांत विजय मिळवला, तो सगळा व्यर्थ ?

**सज्जनसिंगः**—दरबारांत सम्राटांना त्या वीरनवालीचं दर्शन—

**सेनानायकः**—ती वीरनवाली !

**शुंभसेनः**—तिचं तें दर्शन घडल्यापासून सम्राटांच्या मनावर हा परि-णाम झाला असावा. तिचा शोध करून आणण्याविषयीं त्यांनीं अमात्यांना आज्ञा केली आहे.

**सेनानायकः**—खरंच, तिचा एकदां शोध करून तिला गाडून टाकलं पाहिजे ! कोणीच कसं तिला पकडून आणीत नाहीं ? आम्ही किती वेळां तरी—

**सज्जनसिंगः**—पण सेनापतीसाहेब, कोणीच तें काम करायला धजत नाहीं ! तिला पकडणं तर काय, पण तिचा नुसता आलाप ऐकला तर सैनिक पळून जातात !

**सेनानायकः**—( स्वगत ) होय, तुम्ही देखील सेनासागर, त्या दिवशीं दरबारांत ऐनवेळीं कच खाल्लीत! त्यावेळीं तिच्या कालिया डोहांत बुडवलेल्या नवऱ्याचा–त्या वीरबाहूचा चेहरा–(उघड) सारेच भ्याड झाले काय?

**सज्जनसिंगः**—तसं नव्हे. पण अमात्यांनीं त्या दिवशींच आपणाला सांगितलं कीं, तिला खुद्द कमलादेवीताईसाहेबांनीं—

**सेनानायकः**—( त्वेषानें उसळून ) त्या नांवाचा ?–त्या नांवाचा उच्चारही आपण सरदार-मंडळानं करूं नये! हीन पुरुषावर मन ठेवून जिनं राजकुल भ्रष्ट केलं–आम्हां सरदार-मंडळाचा अपमान केला—

**सेवकः**—(प्रवेश करून) बाहेर हेराध्यक्ष आले असून आज्ञेची वाट पहात आहेत.

**सेनानायकः**—ठीक आहे, येऊं दे त्यांना. [**सेवक** जातो.] आज नुसता बातम्यांचा कहर आहे.

**हेराध्यक्षः**—( प्रवेश करून ) स्वामी विश्वानंदजी राजाज्ञेवरून मुक्त झाले असून—

**सेनानायकः**—काय, स्वामींना मुक्त केलं ? म्हणजे अमात्यांना वेड लागलं कीं काय ?

**हेराध्यक्षः**—खुद्द सम्राटांनीं त्यांना तशी आज्ञा केली.

**सज्जनसिंगः**—शिवाय, युद्ध होऊन गेल्यावर आतां त्यांना प्रतिबंधांत ठेवण्याचं कारणही नाहीं.

**हेराध्यक्षः**—मुक्त होतांच त्यांना जेव्हां कळलं, कीं दीनदासजींना पकडल्यामुळं लोक सर्वत्र फार खवळून गेले आहेत, तेव्हां त्यांना फार खेद झाला. ते प्रथम संजीवनालयाकडं जात होते. पण दीनदासजींना सेनापतीसाहेबांनीं आपल्याच दुर्गांत नेऊन ठेवलं असून, खवळलेला लोकसमुदाय दुर्गाकडेच चालला आहे असं जेव्हां त्यांनीं ऐकलं, तेव्हां त्या लोकसमुदायाला थोपवून धरण्यासाठीं, त्यांनीं आदेश पाठविला असून, पाठोपाठ तेही इकडेच त्वरेनं येत आहेत. त्यांच्या मुक्ततेचं हें वर्तमान ऐकून इतरही आबालवृद्धांच्या झुंडीच्याझुंडी, त्यांच्या दर्शनासाठीं इकडंच येत आहेत.

**सेनानायकः**—बरं, आणखी कांहीं विशेष ?

**हेराध्यक्षः**—तूर्त तरी नाहीं.

**सेनानायकः**—ठीक आहे, या तर.                [ हेराध्यक्ष जातो.

**सज्जनसिंगः**—स्वामिजींना याच वेळीं सम्राटांनीं मुक्त केलं, हा एक अनायासं सुयोगच म्हणायचा !

**सेनानायकः**—तो कसा काय ?

**सज्जनसिंगः**—त्यांच्या उपदेशानं खवळलेले लोक निःसंशय शांत होतील.

**सेनानायकः**—म्हणजे तुमच्यानं ते होणार नाहींत, असंच कीं नाहीं ? क्षात्रतेजाला हा असला कमकुवतपणा शोभतो काय ? तुमची नुसती कल्पना मनांत आली, कीं लोक शांत झाले पाहिजेत ! सिंहाच्या नुसत्या वासानंच वन्य पशूंची कशी अवस्था होते ? पण तुम्ही असे कमकुवत झालांत, म्हणून दरबारांत तुम्हां सिंहांची आयाळ या लोकांनीं गदगदा हालवली ! आणि आतां या लोकांना शांत करण्यासाठीं एका सोंगी-ढोंगी गोसावड्याच्या पायावर लोटांगण घालतां ? हा ढोंगी गोसवडा–सिंहापुढं साळसूद साधूचं सोंग आणणाऱ्या जंबुकाप्रमाणं याची कारवाई आहे ! शांततेचा आव आणून हा काय करील, याचा कांहीं नेम आहे काय ? युद्धाच्या सुरवातीला याच्या या शांततेच्याच उपदेशानं कशी अवस्था झाली होती, आठवत नाहीं काय ? याला जेव्हां अंधारकोठडींत कोंबून ठेवला, तेव्हांच युद्ध पुढं चालू करणं शक्य झालं. आणि आतां अमात्य अशा भयकर घातकी मनुष्याला मुक्त करतात ! आणि खवळलेल्या लोकांना हा आतां शांत करणार ! ठीक आहे ! हे लोक कुठं ? आमच्या दुर्गाकडं येत आहेत ? सिंहाच्या गुहेंतच ते आपल्या चाली येत आहेत !

**सज्जनसिंगः**—म्हणजे सेनानायक, आपल्या काय मनांत आलं आहे ?

**सेनानायकः**—काय म्हणजे ? लोकांना शांत करणार !

**सज्जनसिंगः**—म्हणजे ?

**सेनानायकः**—मृगेंद्राचा वास यांच्या नाकांना येईनासा झाला आहे ! मृगेंद्राचं रूप यांच्या डोळ्यांना दिसेनासं झालं आहे ! मृगेंद्राच्या गुहेकडं यांचे पाय बेलाशक वळूं लागले आहेत ! या सगळ्या अवयवांचे नाहींसे झालेले हे अनुवंशिक संस्कार त्यांना पुन्हा मिळावेत, म्हणून त्यांना आम्ही भस्मीभूत करून शांत करणार !

सज्जनसिंगः—सेनानायक ! क्रोधाच्या आधीन होऊन आपण हें असं कांहीं करूं नका !

सेनानायकः—अहो, हें लोकांचं प्रस्थ दिवसेंदिवस किती बळावत चाललं आहे, हें तुम्हीं पहात नाहीं काय ? यांनीं निर्माण केलेली पथकंच मुळीं प्रथम आम्हीं युद्धांत घ्यायला नको होतीं. आतां यांची उपेक्षा केली, तर सरदार-मंडळाची कांहींच प्रतिष्ठा राहाणार नाहीं. यांना शासन केलंच पाहिजे.

सज्जनसिंगः—पण शासन करायला राजाज्ञा नको काय ?

सेनानायकः—दीनदासाला पकडण्याची राजाज्ञा आपणाला मिळालेली नाहीं काय ? त्याला पकडल्यामुळंच हे लोक दुर्गाकडं चाल करून येत नाहींत काय ? त्यांचा बंदोबस्त करून त्यांना शासन करणं हें आपलं कर्तव्यच आहे.

शुंभसेनः—बरोबर आहे ! सेनानायक म्हणतात तें अगदीं बरोबर आहे ! यांचा हा बेगुमानपणा कधींही चालूं देतां कामा नये. त्यांना शासन केलंच पाहिजे ! आणि त्याला हीच संधी योग्य आहे !

सेनानायकः—कसं बोललांत शुंभसेन ! हीच संधि योग्य आहे ! चला, सज्जनसिंग, सरदार-मंडळाची प्रतिष्ठा आपणाला राखायची आहे. क्षत्रियसिंहाचा प्रभाव–त्याची चळचळां कंप उत्पन्न करणारी गर्जना–नुसत्या वासानंच गलितावयव करून सोडणारा त्याचा दरारा या लोकांच्या रक्तांत–हाडामांसांत असा भिनवून सोडला पाहिजे, कीं पिढ्यान् पिढ्या तो कायम राहील ! [ सेनानायक व शुंभसेन जातात.

सज्जनसिंगः—( जातां जातां ) हें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं !

[ पडदा.

---

## प्रवेश चौथा.

[ स्थळः—सेनापतीच्या दुर्गानजीकचा प्रदेश. काकाजी येतात.]

काकाजीः—( स्वगत ) आनंदाची ही बातमी इतकी भिण्यासारखी आहे ? दीनदासजींना सेनापतींनीं आपल्याच दुर्गांत प्रतिबंधांत ठेवल्याचं ऐकून ताईसाहेब तडक इकडे आल्या. मला महाराजांनीं त्यांच्या बरोबर

रहायला सांगितलेलं. पण आनंदा म्हणतो कीं, अगोदर ही बातमी निकडीनं महाराजांच्या कानावर घातलीच पाहिजे! सेनापतीसाहेब इतक्या थराला गोष्टी नेतील? भाईजींच्या कैदेमुळं लोक खवळून इकडे येत आहेत, हें खरं; पण स्वामिजी आतां मुक्त झाले असून, तेही लोकांना शांत करण्यासाठीं इकडंच येत आहेत. स्वामिजींचा शब्द लोक कधींही मोडणार नाहींत! लोक शांत होऊन घरोघर गेल्यावर सेनापति काय करणार? तरी देखील आनंदा म्हणतो, कीं सेनापतींचा मनोदय कांहीं वेगळाच आहे! महाराजांच्या आणि लोकांच्याही जागृतीच्या हालचालीमुळं वतनदार दैवतांचा क्षोभ झाला असून, प्रसंग फार बिकट ओढवणार आहे. आणि तो महाराजांनींच समक्ष इकडं आल्यानं टळणारा आहे, असं त्याचं म्हणणं! तो स्वतांच महाराजांकडं गेला असता, पण स्वामीजींच्या आज्ञेवरून तांतडीनं संजीवनालयांत जाऊन, भाईजींना त्याला इकडं घेऊन यायचं आहे! आनंदा निष्कारण कधींच इतका घाबरायचा नाहीं. त्याच्या बातम्या बित्तम् असून त्याचे कयास कधींही चुकत नाहींत! वेळ न गमावतां महाराजांकडे एकदम जावं हेंच चांगलं. [जातात.

---

## प्रवेश पांचवा.

[**स्थळः**—सेनापतीच्या दुर्गानजीकचा प्रदेश. **मोतिराम** व कांहीं लोक बोलत येतात.]

**मोतीरामः**—तें कांहीं नाहीं, स्वामीजींना आपण सर्वांनीं निक्षून सांगितलं पाहिजे, कीं भाईजींची मुक्तता केल्याखेरीज आम्ही स्वस्थ रहाणार नाहीं!

**एक गृहस्थः**—अलबत्! आम्ही नाहींच स्वस्थ रहाणार!

**मोतीरामः**—स्वामिजी स्वतांच तपाचरणासाठीं अदृश्य झाले असतील, असं आपण इतके दिवस समजत होतों. पण त्यांच्यासारख्या विश्वप्रेमी साधूनाही आपल्या मतलबासाठींच या उन्मत्त सत्ताधाऱ्यांनीं इतके दिवस अंधारकोठडींत कोंडून ठेवलं होतं!

**सर्वः**—पण आतां आम्हांला त्यांचं दर्शन घडणार! स्वामिजींचं

आम्हांला दर्शन घडणार ! बाप्पाजींचं आम्हांला दर्शन घडणार ! केवढा आनंदाचा दिवस ! स्वामिजी मुक्त झाले !

**मोतीराम**:—स्वामिजी मुक्त झाले, पण भाईजींना कैद केलं हें विसरतां काय ?

**सर्व**:—नाहीं, नाहीं. तें आम्ही कसं विसरूं ?

**मोतीराम**:—भाईजींचा काय अपराध ?

**एक गृहस्थ**:—दरबारांत प्रजेच्या वतीनं दाद मागितली !

**मोतीराम**:—तुम्हां-आम्हांला कैद केलं असतं, तर तें एकवेळ रास्त होतं. पण आम्हांला नेहमीं शिस्तींत ठेवणारे, महाराजांशीं एकनिष्ठेनं वागणारे असे आमचे भाईजी, त्यांना काय म्हणून कैद केलं ?

**दुसरा गृहस्थ**:—आम्हांला शिस्तींत ठेवतात म्हणून ?

**एक गृहस्थ**:—हो, सेनापतींना दुसऱ्याची शिस्त कशी चालेल ?

**मोतीराम**:—तें कांहीं नाहीं ! या सर्वांच्या डोळ्यांत प्रजेनं प्रसंगीं आपलं रक्त वेंचून त्याचं चरचरीत अंजन घातलं पाहिजे ! कानांवर नुसते करुणालाप घालून काय उपयोग ? शस्त्रांचे खणखणाट—

[ इतक्यांत दूर शस्त्रांचे खणखणाट व आरोळ्या ऐकूं येतात. कांहीं घाबरलेले लोक धांवत येतात.]

**लोक**:—धांवा ! धांवा ! पळा ! अहो मोतीराम, तिकडं केवढा भयंकर प्रसंग! सेनापतींच्या सैनिकांनीं लोकांना गराडा घातला असून—

**मोतीराम**:—काय, सैनिकांनीं लोकांना गराडा घातला ? चला ! चला ! मग पाहतां काय ?

**लोक**:—अहो मोतीराम, तिकडं काय आगींत उडी टाकायला जातां ?

**मोतीराम**:—मग लोक अगींत सांपडले असतां त्यांना टाकून पळून जातां ?

**लोक**:—लोकांना वांचवण्यासाठीं खुद्द स्वामिजी दोन्ही हात पसरून पुढं झाले आहेत. पण—

**मोतीराम**:—स्वामिजींनीं पुढं व्हावं आणि तुम्हीं आम्हीं पळून जावं ? लाज वाटत नाहीं ? चला, या मोत्याच्या बरोबर आगींत उडी टाकायला कोण तयार आहेत ? चला !

[ जातो. कांहीं त्याचे मागोमाग जातात व कांहीं उलट दिशेनें पळूं पहातात. पण त्याच बाजूनें खुद्द **सेनापति** व कांहीं **सैनिक** येत असल्याचे दिसतात.]

**लोकः**—अरे बापरे ! हे तर सेनापतीच इकडं आले ! पळा ! पळा ! पण पळायचं कुठं ? अरे इकडं—पण इकडं कुठं ? चला, चला ! आतां तिकडंच चला !

[**मोतीराम** गेला तिकडंच जातात. **सेनापति, सरदार** व **सैनिक** येतात.]

**सेनानायकः**—जा! जा! त्या लोकांचा पाठलाग करा ! चालवा! चालवा! बेलाशक शस्त्र चालवा ! पुढं येईल त्याला कापून काढा ! एक चिटूपांखरूं देखील तुमच्या गराड्यांतून जाऊं देऊं नका. सिंहाची आयाळ धरायला त्याच्या गुहेवर चाल करून येतां काय ? आम्हां सरदारांच्या तोंडाला तोंड ? नजरेला नजर ? बेलाशक डोळ्यांत तरवारी भोंसका ! मुंड्या छाटून टाका ! आरोळ्या ? मारूं द्यात आरोळ्या ! फोडा ! अशाच आरोळ्या फोडा ! तुमच्या त्या दीर्घ आरोळ्या तुमच्या घरोघर असलेल्या गर्भिणींच्या पोटांतील गर्भांना ऐकूं गेल्या पाहिजेत ! म्हणजेच या आरोळ्या फोडायला लावणारा सरदार-मंडळाचा दरारा वंशपरंपरेनं पिढ्यान् पिढ्या राहील ! शाबास ! जीते रहो, मेरे बहाद्दर शूर शिपाई ! महायुद्धांतल्या बहाद्दरीहूनही आजची तुमची शिपाईगिरी या तुमच्या सेनानायकाला बहुमोल वाटते ! ते साधू सांगत असतात नाहीं, कीं बाहेरच्या उपाधींपेक्षां आंतल्या वासना दुष्ट ! तसंच बाहेरच्या शत्रूपेक्षांही हे असले अंतःशत्रू महादुष्ट, महाघातकी ! त्यांचा आज तुम्हीं मोड केलात. शाबास ! चला आतां. आजची रात्र या जागेची नाकेबंदी करून टाका. कुणालाही फिरकूं देऊं नका. उजाडल्यावर गिधाडं आपलं काम करतीलच ! [ जातात.

---

## प्रवेश सहावा.

[ **स्थळः**—सेनापतींच्या दुर्गाजवळील प्रदेश. **सम्राट् कुमारसिंह.**]

**कुमारसिंहः**—( स्वगत ) केवळ एका घटकेची चुकामूक; पण केवढा अनर्थ ! आनंदाची भीति यथार्थ होती. कोण अघोर कर्म हें ! प्रजेचा

रक्तपात ? माझ्या राज्यांत मला हें स्वप्नच वाटत होतं. पण आयुष्य बेगुमान घालवणाऱ्या माणसाला मरणसुद्धां स्वप्नासारखंच वाटतं नाहीं ? अशा करंट्याचं आयुष्य हें जीवित नसून, मृत्यूचे पाश टाकण्याची केवळ काळाची कसरत होय ! कुमारसिंहा, पहा ! डोळे उघडले असतील तर पहा ! अजूनही हें स्वप्नच आहे काय ?

**काकाजीः**—( प्रवेश करून ) महाराजांनीं हें साहित्य घेऊन ठरवल्याप्रमाणं वेष पालटून तयार व्हावं. सेनापतीसाहेब आतां इतक्यांत येतील.

**कुमारसिंहः**—( दाढी वगैरे लावीत असतां ) ते जागेच होते वाटतं?

**काकाजीः**—झोंपेंत नव्हते ! तरी पण त्यांना जागं करावं लागलं ! आणि तेंही प्रयासानंच !

**कुमारसिंहः**—म्हणजे ?

**काकाजीः**—झोंपेंतून मनुष्य हुशारीनं जागा होईल; पण धुंदींतून ? महाप्रयासाचंच काम आहे. अगोदरच रक्तपाताची धुंदी, आणि त्यावर रक्ताप्रमाणंच आरक्त अशा मद्यपानाची धुंदी ! सेनापतीसाहेब, आपल्या निवडक सरदार-मंडळासह मदिरापानाच्या रंगांत गुंग होते ! आपल्या आज्ञेचा लखोटा त्यांना दिला; पण ती आज्ञा प्रथम त्यांच्या डोक्यांत उतरेच ना ! 'आज्ञा बिज्ञा सब् झूट है' असंच त्यांचं कांहीं वेळ चाललं होतं. मग जेव्हां राजमुद्रा दाखवली आणि माझ्याकडं पाहिल्यावर जेव्हां माझी ओळख पटली, तेव्हां स्वारीची धुंदी उतरून ते यायला तयार झाले. ठीक आहे. महाराजांचा वेषही तयार झाला. हे आलेच ते.

**सेनानायकः**—( हातांत आज्ञेचा कागद घेतलेले असे प्रवेश करून ) इतक्या दूर अंतरावर महाराजांना हें अंतर्ज्ञान तर झालं नाहीं ? आणि तुम्हांला इथं मनोवेगानं पाठवलं काय ? आणि तुम्हीं कोणी नवेच प्रतिनिधी दिसतां ? छट् ! हें झूट आहे ! हा हुकूम आम्हीं नाहीं मानला तर—

**कुमारसिंहः**—सेनापतींच्या हातून तो एक अक्षम्य-पण छे:, सेनापति अशी अवज्ञा खास करणार नाहींत. हुकुमावर दरबारी मुद्रा आहे. शिवाय प्रसंग ओळखून महाराजांनीं खुद्द आपल्या हातांतली ही मुद्रांकित आंगठीही पाठविली आहे.

**सेनानायकः**—( आंगठी पाहून ) आश्चर्य आहे ! बरं, आपणाला काय कत्तलीचं रणक्षेत्र दाखवायचं ? आणि आपण कारणांची शहानिशा करणार ? ठीक आहे, या तर.

[ जातात. पडदा उघडून कत्तलीच्या एका भागाचा देखावा. सर्वत्र 'आयाईग', 'देवारेदेवा', 'पाणी पाणी', 'स्वामिजी', 'माईजी', 'भाईजी आले काय', 'पाणी पाणी' असे प्राणांतिक वेदनांचे शब्द ऐकूं येतात.]

**कुमारसिंहः**—हाय, हाय ! किती अघोर कर्म हें ! मनानं कितीही कल्पना केली, तरी हा अमानुष कर्माचा प्रत्यक्ष देखावा ब्रह्मदेवाच्या स्वप्नीं?—यमाला तरी खरा वाटेल ?—कलीच्या बापाच्यानंसुद्धां निर्माण करवणार नाहीं ! काकाजी, जा, जा, कुठून तरी पाणी आणा हो ! [**काकाजी** जातात.] सेनापति ! हा आपलाच पुरुषार्थ ?

**सेनानायकः**—प्रतिनिधीसाहेब ! महाराजांच्या आज्ञेप्रमाणं जें कांहीं करणं असेल, तेवढंच करा ! उपरोधिक बोलण्यानं—

**कुमारसिंहः**—( कत्तलीमध्यें हिंडून न्याहाळून पहात असतां मध्येंच सेनापतीस थांबवून ) थांबा सेनापति ! हे इथं लंगडे पांगळे ?—काय ? हे सारे धडधाकड योद्धे असून, आपल्याशीं लढतां लढतां हे पंगू झाले ? यांचीं शस्त्रं ? आपण हिरावून घेतलींत होय ? आणि हे ? अगदीं गलितावयव म्हातारे ? आशीर्वादानं माणूस कैक वर्षांनीं म्हातारा होतो; पण ऐन ज्वानींत असलेले हे योद्धे आपल्या पराक्रमानं एका क्षणांत म्हातारे झाले काय ?

**सेनानायकः**—या म्हाताऱ्याकोताऱ्यांना आणि लंगड्यापांगळ्यांना भलभलत्या लोकांच्या संगतींत इथं यायला कोणीं सांगितलं होतं ? आपण होऊन आगींत उडी घेणारांच्या कपाळीं कपाळमोक्ष हा ठेवलेलाच !

**कुमारसिंहः**—भलभलते लोक ?

**सेनानायकः**—आपणाला माहीत नाहीं काय ? हे त्या हरामखोर दीनदासाचे बेफाम झालेले लोक ! राजाज्ञेवरून आम्हीं त्याला पकडलं, म्हणून आमच्या दुर्गावर हे चाल करून येत होते.

**कुमारसिंहः**—दुर्गाकडं येत होते, पण दुर्गावर चाल करून येत होते ?

महाराजांना समजलेली बातमी अशी नाहीं. शिवाय, दीनदासाला पकडण्याची आज्ञाही महाराजांनीं दिलेली नाहीं. पण तें असूं द्या. या लोकांना थोपवून धरून शांत करण्यासाठीं स्वामी विश्वानंदजी इकडं आले होते ?

**सेनानायकः**—तो ढोंगी गोसावडा ? त्याला अगोदर मुक्तच कां केलं ? तो शांत करणार ? उलट भलतंच केलं असतं ! युद्धाच्या सुरवातीला त्यानं काय केलं, ठाऊक नाहीं काय ?

**कुमारसिंहः**—कांहीं झालं तरी त्यांचा शांततेचाच उपदेश नसतो काय ? ते काय करतात, तें पहायचं तरी होतंत. थोडा वेळ मन आंवरून धरलं असतंत, तर हा अनर्थ टळला नसता काय ?

**सेनानायकः**—टळायला कुणाला हवा होता ? केव्हां ना केव्हां तरी हें व्हायला हवंच होतं. या बेफाम, बेमुरवतखोर लोकांना हें यथायोग्य शासन झालं ! यांनीं राज्यांतली सगळी शिस्त, कदर पार नाहींशी करून टाकली. कुणाचाच यांना दरारा वाटेनासा झाला. राजसत्ता ही केवळ आम्हां सरदारांच्या क्षात्रतेजावर अवलंबून त्या तेजाची प्रतिष्ठाच यांना वाटेनाशी झाली. महायुद्धांत आम्हीं मिळवलेल्या साऱ्या विजयाची—शांततेची—आमच्या राज्यांतलेच हे जंबूक नासाडी करून टाकणार काय ? परवांचा शांततेचा दरबार यांनींच आम्हां सिंहापुढं धिटाईनं कोल्हेकुई करून उधळून टाकला. आणि आमचा सगळा मनोभंग केला. यांची अशी कत्तलच काय, साऱ्या राज्यांत यांची शिकार करून यांचा पुरा नायनाट केला पाहिजे !

**कुमारसिंहः**—आणि मग राज्य कुणावर करावयाचं ? माणुसकी सोडून जीं केवळ तुमच्या काबाडकष्टाचीं मुकीं जनावरं बनतील, त्यांच्यावर होय ? तोंडांत लगाम अडकवा, नाकांत वेसण घाला, पाठीवर रट्टे द्या,—हूं कां चूं करणार नाहींत, त्यांच्यावर ? एकूण आमच्या महाराजांनीं माणसावर राज्य करावं असं तुम्हाला वाटत नाहीं. मग त्यांना नृपति म्हणण्याऐवजीं पशुपति म्हणावं लागेल !

**सेनानायकः**—प्रतिनिधीसाहेब !—

**कुमारसिंहः**—ऐका, सेनापतीसाहेब ! या पशूंच्याच आरोळ्या काय ? पण पशूंना देखील आपण एकाच प्राणांतिक आरोळीनं मोक्ष देतों.

आणि इथं नाकेबंदी करून आपण यांना 'पाणी पाणी' करीत तडफडत ठेवलं आहे, तें काय म्हणून ?

**सेनानायकः**—त्यांत काय आहे ? तो युद्धनीतीचा दंडकच आहे ! रात्रीच्या वेळीं दगाफटका झाला तर ?

**कुमारसिंहः**—पण त्यांना असं रात्रभर तडफडत ठेवायचं ? निदान अंतकाळचं पाणी तरी—

**सेनानायकः**—तें काय आम्हां क्षत्रियांचं काम आहे कीं काय ? तरवारीचं पाणी पाहिजे तर—

**कुमारसिंहः**—तें तरी पुरं पाजायचं होतं ! ऐका ! सुटकेसाठीं धडपडणाऱ्या जीवात्म्यांच्या या प्राणांतिक वेदना ऐका ! तापलेल्या सळई-प्रमाणं कानांत घुसून बधीर झालेल्या अंतःकरणालाही त्या चरका देत नाहींत काय ? आणि हे, काय ? अर्भकांचे टाहो ? हाय ! हाय ! आणि या त्यांना कडेवर घेऊन स्वामिजींच्या दर्शनासाठीं आलेल्या त्यांच्या माता ! त्यांना दुग्धपान करीत असतांनाच गतप्राण होऊन इथं पडल्या आहेत ! हरहर ! आतां दुधाऐवजीं तरवारीनं काढलेलं स्तनांतलं रक्तच जणुं आपल्या अर्भकांना पाजीत आहेत ! हो, दूध तरी रक्तासाठींच नाहीं ? पाणी, पाणी ! काकाजी ! अरे, कुणी पाणी आणारे यांना ! अंतकाळीं यांना पाणी तरी मिळूं द्या. सेनापतीसाहेब, निदान तुमच्या हृदयांतल्या गंगायमुना तरी वाहूं द्यात ! त्यांनींसुद्धां या अंतकाळीं तडफणाऱ्या जीवांची शांति होणार आहे !

**सेनानायकः**—बस्स, प्रतिनिधिसाहेब ! हा देखावा तुम्ही आम्हांला काय म्हणून दाखवतां ? या आरोळ्या काय म्हणून ऐकवतां ? मदिरेचा आरक्त पट डोळ्यांवर चढवून आणि रणभेरीचे सूर कानांत भिनवून केवळ कठोर तरवारीनं आम्ही हें काम करीत असतों. त्या आम्हांला तुम्ही हें काय म्हणून दाखवतां ? भारतवर्षाचं क्षात्रतेज कमकुवत व्हावं, असं महाराजांना वाटतं काय ? दया माया असल्या नेभळट विकारांनीं तें केव्हांही कमकुवत होऊं नये, म्हणून शांततेच्या काळांतही अश्वमेधादि यज्ञ आणि मृगया यांच्या योजना त्यासाठीं केलेल्या असतात. बस्स ! हा असला देखावा पाहून आमच्या क्षात्रतेजाला कमकुवत करणाऱ्या नेभळट अश्रूंचा विटाळही आम्ही आमच्या डोळ्यांना होऊं देणार नाहीं !



कुमारसिंह ( रा. दाते ):—हा भारतवर्षाचा राजा इथं यावेळीं तिचा वाली आहे ! ( पृ० ९३ )

**कुमारसिंहः**—शाबास ! जीते रहो क्षात्रतेजा ! मग गांजलेल्यांचं रक्षण करण्यासाठीं क्षात्रतेज म्हणतात, तें खोटंच तर !

**सेनानायकः**—उन्मत्त, चढेल अशांचा नायनाट करण्यासाठीं क्षात्र-तेज आहे !

**कुमारसिंहः**—कसं बोललांत ! उन्मत्त लोक दुबळ्यांना गांजतात, त्यांना कुणी वाली नसतो—

[**वीरनवाली** कत्तलीचे बाजूनें 'वीर-न्-वाली !' इ० आलाप म्हणत येते.]

**सेनानायकः**—( स्वगत ) ही आली का ? माझ्याच सैन्यांतील एका भिकारड्या शिपुडर्याची चढेल बायको—कैकजणींपैकीं एक ! पण पातिव्रत्याचा केवढा बखवा माजवला आहे ! ब्रह्महत्येसारखी माझ्या पाठीस लागून 'वाली ! वाली !' म्हणून लोकांना चेतवते ! पण आतां भली सांपडली ! ( उघड ) दरबाराचा भंग करणारे चामुंडे ! त्यावेळीं निसटलीस; पण आतां कुठं जाशील ? तुझे सारे वाली हे पहा, आजच्या कत्तलींत फडशा झाले ! आतां इथं तुला कोण वाली ? [तरवार उपसतो.

**कुमारसिंहः**—( वेष टाकून ) हा भारतवर्षाचा राजा इथं या वेळीं तिचा वाली आहे ! क्षात्रतेज उन्मत्तांचा नायनाट करण्यासाठींच आहे, नाहीं ? पण जा ! तुझा नायनाट करण्यासाठीं हा भारतवर्षाचा सम्राट् आपली तरवार विटाळूं इच्छित नाहीं. खरं क्षात्रतेज ही परमेश्वरी पुण्य-शक्ति आहे. त्या शक्तीचं तेज या राजाच्या अंगीं असेल, तर त्या तेजाच्या केवळ उदयानंच तुझा आपोआप नायनाट होईल ! तुला मग थारा ? या ब्रह्मांड कटाहाच्या बाहेरचा तमोमय प्रदेश ! जिथला घनदाट कांटेरी काळोख रोमरोमीं अंगांत घुसून, सर्वत्र श्वासाला कोंडून, गुदमरून, कासावीस करून टाकतो, तो घोर तमोमय प्रदेश ! जा ! त्या प्रदेशाला योग्य असा हा तुझा काळवंडत चाललेला चेहरा—काळतोंडया !—लपव ! लपव !

[राजा प्रगट होतांच **सेनापति** विराटस्वरूप दिसल्याप्रमाणें भयचकित, गर्भगळीत, होत होत अखेरीस पूर्ण लज्जित होऊन जीव घेऊनच पळून जातो. **वीरनवाली** प्रसन्नतेनं तें दृश्य पहात सेनापती-च्या मागें जाते व **सेनापति** गेल्यावर **राजाला** आपल्या मागं येण्याविषयीं खुणावते.]

**कुमारसिंहः**—काय, हतदैवी स्त्रिये ! तुझ्यामागं येऊं ? भारतवर्षाच्या भूमाते ! हा राजा तुझा वाली झाला आहे. मी काय करूं तें सांग. (ती कत्तलीच्या देखाव्याकडे बोट करते) हा सारा देखावा मी पाहूं ? बरोबर आहे ! मींच पाहिला पाहिजे ! त्या आसुरी सेनापतीच्या मदांध डोळ्यांनीं हा पाहून काय उपयोग ? कुमारसिंहा ! तुझे डोळे उघडले आहेत म्हणतोस—तर तूंच—तूंच हा पाहून—काय ? ही कशाकडं बोट दाखवते ? ही एक दुसरी स्त्री ? ( इतक्यांत **वीरनवाली** एकदम जाते.) आणि वीरनवाली कुठं गेली ? एकदम नाहींशी झाली ? आणि ही कोण ? वांकून चेहरे न्याहाळीत हिंडते आहे ? नाहीं, नुसती न्याहाळीत नाहीं. तळमणाऱ्या या जीवांना अंतकाळचं पाणी देऊन त्यांचा अंतरात्मा शांत करीत आहे ! धन्य ! धन्य स्त्रीजाती तुझी ! पहा ! आसुरी शक्तीच्या मदानं धुंद झालेल्या करंट्या क्षत्रियांनो पहा ! क्षात्रतेजाचं खरं खरं दैवी स्वरूप—हें पहा ! तुम्हीं निर्माण केलेल्या या अक्राळविक्राळ स्मशानाला, आणि त्यांत पिशाच्चवत् वावरणाऱ्या नागव्या तरवारींच्या तुमच्या पहारेकऱ्यांना न जुमानतां, केवळ तुम्हीं तडफडत ठेवलेल्या या जीवांना अंतकाळचा आराम देण्यासाठीं ही अबला म्हटली जाणारी स्त्री, निर्भयतेनं इथं प्रवेश करून, आपलं खरं क्षात्रकर्म करीत आहे ! धन्य धन्य स्त्रीजाती ! गांजलेल्या जगाला त्यागी वीरवृत्तीनं आराम देऊन, क्षात्रधर्माचं खरं खरं स्वरूप तुम्हींच दाखवावं ! आम्ही पुरुषांनीं आपल्या क्षात्रधर्मानं हे असले देखावे निर्माण करण्यांत आणि तुम्हां स्त्री-जातीची त्या वीरनवालीप्रमाणं विटंबना करण्यांत धन्यता मानावी !—पण ही कोण स्त्री आहे ? क्षणभर उभी राहून ही कुणाला हांक मारीत आहे काय ?

**वत्सलामाईः**—बाप्पाजी ! बाप्पाजी ! कुठं आहांत तुम्हीं ?

**कुमारसिंहः**—कोण, ही देवी ? राजा ! लपव ! लपव ! आतां तुझा चेहरा लपव ! तुझ्या नादानपणाचाच हा ढळढळीत देखावा इथं दिसत असतां, तुला आपला चेहरा या दिव्य मूर्तीच्या समोर कसा नेववेल ? लपव, लपव तो ! [ वेष घेतो.

**वत्सलामाईः**—सांगणारे सांगतात, कीं या निरपराधी जीवांचं रक्षण करण्यासाठीं आपण आपल्या विशाळ छातीची ढाल करून, दोन्ही हात

पसरून 'दीनको दयाल !' 'दीनको दयाल !' अशी करुणा भाकीत सर्वत्र वावरत होतां. आपली काय अवस्था झाली असेल ?

**कुमारसिंह**:—शिव ! शिव ! दीनवत्सल प्रभो ! अशा या सत्त्वशील महात्म्याची करुणेची हांक देखील वांयाच झाली कारे ? केवळ वांयाच झाली ? हे इतके जीव नाहक–नाहक गेले ? केवळ वांयाच झाली ? ( **काकाजी** येतात ) कोण काकाजी ? पाणी घेऊन आलांत होय ? अगदीं आवाज करूं नका. तें पाणी इकडं द्या आणि तुम्ही जाऊन आपल्याबरोबर जे लोक आणलेले आहेत, त्यांना साऱ्या कत्तलींत हिंडून या तळमळणाऱ्या जीवांना पाणी द्यायला लावा. कुणाला तरी राजधानींत पाठवा आणि अमात्यांच्या कानांवर हें सर्व घालून, कांहीं वैद्य आणि डोलीवाले इकडं तावडतोब घेऊन येण्याविषयीं त्यांना आमची आज्ञा आहे असं कळवा.

[ **काकाजी** 'आज्ञा सरकार' म्हणून जातात.

**वत्सलामाई**:— युद्धाच्या सुरवातीपासून आपण ही करुणा भाकीत आलांत. अखेर युद्ध होणारच असं पाहून महाराजांकडं म्हणून आपण जायला निघालांत, त्यावेळीं निर्वाणीची गोष्ट म्हणून आपण आपल्या या कन्येला सांगितलीत. 'बाळ वत्सा ! भारतवर्षावर कठिण प्रसंग येणार ! म्हणून सांगतों, पूर्वकाळीं अश्वमेधाच्या भरीं भरून क्षात्रमदानं अंध झालेला अर्जुन आपल्याच पुत्राशीं–बभ्रुवाहनाशीं युद्ध करायला प्रवृत्त झाला. स्त्री-पुत्रांनीं परोपरीनं विनवलं,–व्यर्थ गेलं ! त्यावेळीं त्या आपत्काळीं भारतीय आर्यस्त्रियांनीं जें केलं,–बभ्रुवाहनाच्या माता चित्रांगी आणि उलूपी यांनीं जें केलं, तेंच तुम्ही स्त्रियांनीं आतांच्या या आपत्कालीं करणं तुमचं कर्तव्य आहे. जेवढे म्हणून युद्धपीडित लोक आढळतील, त्या सर्वांची चित्रांगी-उलुपीप्रमाणंच मातेच्या ममतेनं शुश्रुषा करून, त्यांच्या जीवांना देववेल तितका आराम द्या.' बाप्पाजी ! आपली ही कन्या यथाशक्ति तें कार्य आजपर्यंत करीत आली, अजूनही करवेल तितकं करते, पण—(दुःखाच्या हुंदक्या-मुळें स्तब्ध होते.)

**कुमारसिंह**:—हरहर ! अशा या विश्वप्रेमी थोर महात्म्याला प्रजापालनाचा बखवा करणाऱ्या आम्हीं राजे लोकांनीं एक भयंकर माणूस म्हणून बंदिखान्यांत कोंडून ठेवायचा !

**वत्सलामाईः**—पण आतां आपण स्वतःच इथं कुठं तरी घायाळ होऊन तळमळत असाल, आणि आपल्याला मात्र तो आराम देण्याचं या आपल्या कन्येच्याच नशिबीं नाहीं काय ? इतक्या जीवांना आजपर्यंत मीं आराम दिला, ती माझी पुण्याई व्यर्थच काय ?—क्षमा करा, बाप्पाजी ! जें कर्तव्य केवळ निरपेक्ष असावं, त्याच्या पुण्याईचं या वेळीं मला स्मरण झालं, याबद्दल आपण या कन्येला दोष लावूं नका.

[ जवळच खोल गंभीर असा आवाज होतो.] नाहीं ! बेटा नाहीं ! पाणी ! हा: ! पाणी !

[ दुसरा आवाज ] अरे, कुणी बाप्पाजींना—स्वामिजींना पाणी द्या रे ! भाईजी नाहींत, कुणी माईजींना बोलवा रे !

**वत्सलामाईः**—कोण, मोती ? बाप्पाजी कुठं आहेत ? कुठं आहेत बाप्पाजी ? ( जवळ जाऊन ) हाय, हाय, बाप्पाजी ! बाप्पाजी ! हें पाणी घ्या—अरे, यांतलं पाणी संपून गेलं ! आतां—

**कुमारसिंहः**—( पुढें होऊन ) देवी, घाबरूं नका. हें घ्या पाणी.

**वत्सलामाईः**—कोण बाबा तूं ? बाप्पाजींना अमर करायला तूं देवच अमृताचा कलश घेऊन आलास काय ? बाप्पाजी ! बाप्पाजी ! हें पाणी घ्या.

**स्वामिजीः**—( पाणी पिऊन ) आहा ! बेटा !

**वत्सलामाईः**—हो, मी आपली वत्सा !

**स्वामिजीः**—बाळ वत्सा ! बेटा ! तुला आपल्या पुण्याईच्या स्मरणानं खेद वाटला. पण त्याच पुण्याईनं तूं भारतमंगलकारिणी हो ! आजपर्यंत माझ्या आश्रमांतिल पाडसांचीच केवळ तूं माई होतीस. यापुढं अखिल भारतीयांची माई हो !

**वत्सलामाईः**—बाप्पाजी ! काय हो ही तुमची अवस्था झाली ?

**स्वामिजीः**—बेटा ! आतां पुढील कर्तव्याकडं लक्ष द्या. ज्या बिचाऱ्यांच्या हातून हें अघोर पाप घडलं, त्यांच्याबद्दल देवाजवळ क्षमा मागायला मीं जातच आहें. पण भाई दीना—दीना आतां क्रोधाच्या आधीन होईल—

**मोतीरामः**—(एकदम उठून) मग ? झालेच पाहिजेत ! आजपर्यंत ते नुसते सरदार-मंडळावर जळफळत, पण आतां राजाविरुद्ध देखील त्यांचा क्रोधाग्नि आम्ही प्रज्वलीत केल्यावांचून रहाणार नाहीं !



**कुमारसिंह** ( रा. दाते ):—तें सर्व पाप स्वसंतोषानं आपल्या माथीं घ्यायला हा भारतवर्षाचा राजा आपळं मस्तक स्वामिजींच्या पुढं नमवीत आहे. ( पृ० ९७. )

**स्वामिजीः**—मोती ! उगी बेटा ! असा क्रोधवश होऊं नकोस. 'भारतवर्षाचा राजा असा नादान नाहीं' या माझ्या अंतकाळच्या शब्दांवर विश्वास ठेव. मला आतांच साक्षात्कार झाला आहे. आमच्या राजाचं अंतःकरण हा अनर्थ पाहून तुम्हां आम्हांपेक्षांही दुःखानं अधिक होरपळून गेलं आहे. आणि तो सर्वांचा वाली आपल्या हृदयांतील गंगायमुनांचं पवित्र जल या तळमळणाऱ्या जीवांना देत इथंच कुठं तरी संचरत आहे.

**मोतीरामः**—इथं ? हंः ! यावेळीं तो अधम आपल्या विलासमंदिरांत मायावतीच्या बाहुपाशांत धुंद होऊन पडला असेल ! या अनर्थाचं सगळं पाप जेव्हां त्याच्या आम्ही माथीं मारूं—

**कुमारसिंहः**—(वेष टाकून व स्वामिजींपुढें गुढगे टेकून) तें सर्व पाप स्वसंतोषानं आपल्या माथीं घ्यायला हा भारतवर्षाचा राजा आपलं मस्तक स्वामिजींच्यापुढं नमवीत आहे. स्वामिजींनीं कृपाळू होऊन या पापाचं प्रायश्चित कोणतं तेवढं याला सांगावं !

**स्वामिजीः**—आहाहा ! भारतवर्षाच्या राजाचा जयजयकार असो ! झालं आमचं कार्य ! मोती ! हा पहा तुमचा राजा ! बाळ वत्सा ! तुझ्या बाप्पाजीला यानं आज खरोखरच अमर केलं नाहीं काय ? पित्याला पुत्र—आपल्या जन्मानं, गुरूला शिष्य—आपल्या सांप्रदायानं, त्याचप्रमाणं साऱ्या भारतवर्षाचं दुःख आपल्या माथीं घेऊन या भारतवर्षाच्या राजानं या विश्वानंदाला अमरच केलं आहे ! येतों आम्ही आतां. प्रजेचा खरा राजा—राम ! विश्वाचा खरा वाली—राम ! सर्वव्यापी—राम ! (प्राण सोडतात. देवी वत्सला व मोतीराम 'बाप्पाजी ! बाप्पाजी !' असा हंबरडा फोडतात. सम्राट् कुमारसिंह गहिंवरून नमन करतात.) [पडदा.

## अंक तिसरा समाप्त

# अंक ४ था.

## प्रवेश पहिला.

[ स्थळः—राजधानी. राजप्रासाद प्रवेशद्वार. काकाजी, कोतवाल, द्वाररक्षक वगैरे.]

**कोतवालः**—काकाजी, ही अपूर्व मिरवणूक पहाण्यासाठीं ठिकठिकाण-च्या आबालवृद्धांचा जनसंमर्द इतका लोटला आहे! सहाजिक आहे, असली ही मिरवणूकच कधीं कुणाच्या पाहाण्यांत नाहीं—ऐकली देखील नाहीं! मिरवणुकीची सर्व सिद्धता केव्हांच झाली आहे. कत्तलींत बळी पडलेल्यांचे जिव्हाळ्याचे आप्त महाराजांच्या आज्ञेप्रमाणं आणविले असून, त्यांना चांदणीचौकांत ध्वजस्तंभाजवळ बसविले आहेत. आतां महाराजां-कडूनच विलंब होत आहे, नाहीं?

**काकाजीः**—महाराज अमात्यांच्या जवळ बोलत आहेत.

**कोतवालः**—अमात्यांना हा मिरवणुकीचा प्रकार रुचला नसावासा दिसतो.

**काकाजीः**—ते कांहीं असलं, तरी महाराज मिरवणूक ही काढणारच. ते फक्त भाई दीनदासजी आणि त्यांच्या मुक्ततेसाठीं गेलेल्या कमलादेवी ताईसाहेब यांची वाट पहात आहेत.

**कोतवालः**—काय कालाचा महिमा आहे! एकेकाळीं भयंकर म्हणून मानल्या गेलेल्या स्वामिजींच्या पुण्यदेहाची स्मशानयात्रा खुद्द महाराज राजकीय मिरवणुकीच्या सन्मानानं काढतात! आणि ज्या दीनदासजींना बंडखोर म्हणून थोडे दिवसांपूर्वी कैदेंत टाकलं, त्यांची महाराज आज आदरानं वाट पहातात!

**काकाजीः**—'राजा कालस्य कारणम्' म्हणतात तें उगाच?

**कोतवालः**—खरं आहे. बरं, पण दीनदासजींकडं कुणी—

**काकाजीः**—होय, त्यांच्या मनाची तयारी करून त्यांना त्वरित् इकडं घेऊन येण्यासाठीं महाराजांनीं कालच मुद्दाम आनंदाला रवाना केलं आहे.

**प्रतिहारी**:—(प्रवेश करून) महाराज काकाजींना बोलावीत आहेत.

**काकाजी**:—चल प्रतिहारी. कोतवाल, तुम्ही महाराजांनीं सांगितल्या-प्रमाणं सर्व बंदोबस्त नीट ठेवा बरं.

[ **प्रतिहारी** व **काकाजी** द्वारांतून आंत जातात. **कोतवाल** वगैरे दुसऱ्या बाजूनें बाहेर जातात. देखावा बदलतो. महाराजांचा महाल. **अमात्य** बाजूला उभे असून, **यतीच्या** पुण्यदेहाच्या स्मशानयात्रेला साजेसा वेष धारण केलेले **महाराज** येरझारा घालीत आहेत.]

**अमात्य**:—महाराज, सेनापति व सरदार-मंडळ यांचेकडून जो अमानुष प्रकार घडला, तो सर्वथैव निंद्य आहे--त्याच्या निंद्यपणाला सीमा नाहीं. मुत्सद्दी कधीं प्राण गेला, तरी ही गोष्ट कबूल करायचे नाहींत—आपल्या मनाशीं देखील कबूल करायचे नाहींत. पण महाराज, आपण ज्या नव-युगाचे प्रवर्तक आहांत, त्या युगांत कुटिल राजनीतीला तर काय, पण प्रत्यक्ष छद्मावताराला देखील प्रांजलपणानं आपल्या गूढ स्वरूपाचं आवि-ष्करण आपण होऊन केल्यावांचून गत्यंतर नाहीं. मी प्रांजलपणानं कबूल करतों, कीं झाला हा प्रकार अमानुष, निंद्य, अगदीं अक्षम्य असा आहे. पण माझं म्हणणं इतकंच, कीं त्याचं परिमार्जन करण्याचे इतर अनेक उपाय असतांना महाराजांनीं याच मार्गाचं अवलंबन करूं नये.

[ **काकाजी** येऊन बाजूस उभे राहतात.

**कुमारसिंह**:—अमात्य, त्याचं परिमार्जन करण्याचा अन्य असा फक्त एकच मार्ग होता. तो मार्ग, म्हणजे भारतवर्षाच्या विक्रमशक्तीचं अधिष्ठान, भारतवर्षाच्या क्षात्रधर्माचे अधिकारी जे सेनापति त्यांच्या हृदयाला पाझर फुटून, तें पश्चात्तापानं पुनीत होणं, हाच होय. त्या मार्गाचं अनुसरण करण्याची संधि त्यांना द्यावी, म्हणून आम्ही त्यांना, त्यांच्या त्या अमानुष कर्माचा हृदयद्रावी देखावा, त्यांची ती धुंदी ओसरल्यावर, रात्रीच्या शांत वेळीं मुद्दाम दाखवला. नानातऱ्हेनं हृदयाला पाझर फोडण्याचा यत्न केला पण व्यर्थ ! त्यावेळीं आमची पूर्ण खात्री झाली, कीं भारत-वर्षाची विक्रमशक्ति ही केवळ पापशक्ति झाली आहे. भारतवर्षाच्या क्षात्रतेजाला आसुरीवृत्तीची भयंकर काजळी आलेली आहे. त्या काजळीचं

काळेकुट्ट विखार मुळांतच भिनलेलं असल्यामुळं, नुसती काजळी वरवर काढीत राहिल्यानं, तें क्षात्रतेज पुण्यस्वरूपानं प्रकाशमान होण्यासारखं नाहीं. म्हणून, असल्या आमूलाग्र विषमय क्षात्रतेजाचा मुळांतच लोप होईल, अशा मार्गाचं मोठ्या दुःखानं, नाइलाजानं अवलंबन करणं आम्हाला प्राप्त झालं.

**अमात्यः**—पण ते मार्ग तरी फार विचारपूर्वक आणि सावधगिरीनं योजिले पाहिजेत ! महाराजांनीं ही मिरवणूक काढण्याचं योजलं आहे, यानं एखादे वेळीं विपरीतच परिणाम होईल कीं काय, अशी मला भीति वाटते !

**कुमारसिंहः**—विषमय झालेल्या क्षात्रतेजाचा लोप हा आतां झालाच पाहिजे. आणि ज्या राजशक्तीमुळं प्रथम तें तेज निर्माण झालं, ती राजशक्तीच जेव्हां हें कार्य करायला साहसानं उद्युक्त होईल, तेव्हांच तो लोप होणारा आहे. हें कार्य किती दुर्घट आहे, तें अमात्यांनींच आमच्या निदर्शनास आणून दिलेलं आहे. या कुमारसिंहाला गोवर्धन पर्वत उचलावे लागतील ! त्याच्या करांगुलींत हें श्रीकृष्णाचं सामर्थ्य कसं येईल ? आबालवृद्ध गोपगोपींच्या प्रेमाचं अवसान जर त्याला मिळेल तरच तें येईल ना ? जें प्रेम गोकुळांत राधारूपानं संचरत होतं त्या प्रेमाचं अवसान—( स्वतःच्या तंद्रींत राहतात.)

**अमात्यः**—( अंतःकरणांत कांहीं प्रकाश पडल्यासारखें होऊन स्वगत) अस्सं ! भारतवर्षाच्या अभ्युदयार्थ झालेला हा नवजीवनाचा संचार—याचं बीज प्रेमाच्या जिव्हाळ्यांत आहे तर ! जगांतील कोणतींही थोर लोकांचीं महत्कृत्यं—मग तीं कितीही लोककल्याणाचीं किंवा जगदुद्धाराचीं असोत, त्यांचा पहिला अंकुर कुठं तरी प्रेमाच्या जिव्हाळ्यांतूनच आलेला असतो ! त्रैलोक्याचा हा पसारा पुरुषोत्तमानं प्रकृतीच्या मायेमुळंच केला ! रावणादिकांचा संहार करून, देवांची मुक्तता रामानं सीतेमुळं केली ! महाराजांचं नवजीवन वत्सलादेवीच्या संजीवनालयांत—

**कुमारसिंहः**—अमात्य ! पापमय वातावरणांत मलीन—भ्रष्ट झालेल्या राजावर लोकांचा विश्वास—लोकांची श्रद्धा बसल्याखेरीज तें प्रेमाचं अवसान त्याला मिळेल काय ? स्वामिजींसारख्या लोकनायकाचा पुण्यदेह राजाच्या

पापशक्तीला बळी पडला असतां, त्या पुण्यदेहाची राजकीय सन्मानानं राजानं स्वतःच अशी मिरवणूक काढून, प्रांजलपणानं तें सर्व पाप आपल्या शिरावर घेतल्याचं लोकांच्या निदर्शनास आणलं, तर लोकांचा विश्वास-- लोकांची श्रद्धा राजावर बसणार नाहीं काय ?

**अमात्यः**—मला भीति वाटते ती ही, कीं या मिरवणुकीनं आपली विक्रमशक्ति--पापमय आहे, मी कबूल करितों—पण ती निःसंशय विरोधी होऊन फार प्रक्षुब्ध होणार आहे ! गोवर्धन पर्वत प्रक्षुब्ध झालेल्या इंद्राच्या मेघवर्षावामुळं अधिकच भाराक्रांत—आणि म्हणूनच उचलण्याला दुर्घट होणारा आहे ! अशा स्थितींत या मार्गानं कदाचित् आपल्या अपेक्षेप्रमाणं लोकांचा विश्वास जर आपणांवर बसला नाहीं, तर—

**कुमारसिंहः**—तर असा राजा लोकांच्या विश्वासाला पात्रच नसून त्याच्या हातून प्रजामंगलाचं कोणतंच कर्म होण्यासारखं नाहीं ! आणि असं समजून हा नालायक कुमारसिंह आपलं सिंहासन बेलाशक सोडून द्यायला तयार होईल !

**अमात्यः**—महाराज ! महाराज ! आपल्या मनाला युक्त वाटतील, ते लोकनुरंजनाचे कोणतेही मार्ग आपण अनुसरा;पण हा विचार मात्र मनांत आणू नका ! या वृद्धाचं एवढं आपण ऐकाच. सिंहासनावर आपण असलांत तर या वृद्धाची पूर्ण खात्री झाली आहे, कीं आपण भारतवर्षाचा अभ्युदयच कराल ! पण जर त्याचा भावनेच्या भरांत त्याग करून, तें मोकळं केलंत, तर त्या अराजक स्थितींत कोणती आसुरी शक्ति त्यावर झडप घालील, त्याचा नियम नाहीं. आणि मानवता अशी दुबळी आणि स्वार्थाच्या हीनवृत्तीची आहे, कीं शक्ति म्हणून जिथं दिसेल—मग ती कितीही आसुरी, पापमय असो—तिच्यापुढं स्वार्थलोलुपतेनं लाळ घोटून तिचा उदेउदे करायला ही हीनवृत्तीची मानवता सदैव तत्पर असते !

**कुमारसिंहः**—अमात्य ! हा केवळ आपला सल्ला नसून प्रेमळ ज्ञानवृद्धाची, माझ्या गुरुजनाची आशीर्वादपूर्वक आज्ञा आहे ! ती हा कुमारसिंह कधींही उल्लंघणार नाहीं. काकाजी ! मिरवणुकीची सिद्धता होऊन फार वेळ झाला, नाहीं ? अमात्य, चला. आपण चांदणीचौकांत जाऊं. दीनदासजी तिथंच येतील.

**अमात्यः**—महाराज, सेनापतींच्या मनांत अजूनही थोडा सुविचार जागृत करतां आला तर पहावा, असं या वेडावलेल्या वृद्धाला–हो, अजूनही वाटतं. वेळ हीच आहे. आज्ञा होईल तर हा दास तिकडंच जाईल.

**कुमारसिंहः**—अवश्य, अवश्य जा. आशा हाच मनुष्याचा प्राण. आणि मरेपर्यंत यत्न हाच त्याचा धर्म ! अवश्य जा. [ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[ **स्थळः**–राजधानीच्या महाद्वाराजवळील प्रदेश. **दीनदास** व **आनंदा** येतात. ]

**दीनदासः**—आनंदा ! तूं एकसारखा दौड करीत मला इकडं राजधानीकडं आणलंस, तें कां ? आणि बोलत कां नाहींस. बाप्पाजींच्या आश्रमांतला बोलका राघू तूं–असा मुका झालेला मीं कधींच पाहिला नाहीं. माझ्या बंदिवासाच्या अल्पावधींतच सारं जग एकदम पालटलं, का माझ्यांतच कांहीं बदल झाला ? राजाज्ञेनं पकडलेला मी, त्या मला माईच्या संजीवनालयांतील परिचारिका देवी किसनकुमारी येऊन मुक्त करतात. मुक्त होतांच, त्या एकाएकीं अदृश्य होऊन, त्यांचे जागीं तूं अचानक माझ्यासाठीं घोडा घेऊन तयार ! पण तूं देखील संजीवनालयाकडं मला न नेतां, इकडं राजधानीकडं घेऊन येतोस ! ( राजधानीकडून 'स्वामी विश्वानंदजी की जय' असा जयजयकार ऐकूं येतो. ) काय ? हा कुणाचा जयजयकार ऐकूं येत आहे ? ( पुन्हा जयजयकार ) स्वामिजींचा ? बाप्पाजींचा जयजयकार ? बाप्पाजी प्रगट झाले ? आणि खुद्द राजधानींत त्यांचा जयजयकार ? काय ? मी बंदिवासांत पडल्यानंतर माझ्या लोकांनीं बंड करून, ही अपूर्व क्रांति घडवून आणली काय ? का बाप्पाजी प्रगट झाले, त्यांनींच ही–

**आनंदाः**—होय, बाप्पाजीच या क्रांतीचे प्रवर्तक होत. बाप्पाजी—स्वामी विश्वानंदजी विजयी झाले आहेत !

**दीनदासः**—काय, स्वामी विश्वानंदजी विजयी झाले आहेत ?

**आनंदाः**—होय, त्यांचा आश्रम, त्यांचा सांप्रदाय, त्यांच्या माईजी विजयी झाल्या आहेत ! ते आतां अमर झाले असून, त्यांच्या पुण्यदेहाची ही जयजयकारपूर्ण मिरवणूक आहे.

दीनदासः—तूं काय म्हणतो आहेस ?

आनंदाः—आपणाला प्रतिबंधांत टाकल्यामुळं लोक प्रक्षुब्ध होऊन, ते आपणाला मुक्त करण्यासाठीं सेनापतींच्या दुर्गाकडं येत होते. इतक्यांत स्वामिजी मुक्त होऊन—

दीनदासः—मुक्त होऊन ? म्हणजे ते प्रतिबंधांत होते ?

आनंदाः—होय भाईजी. ते अदृश्य झाले, अशी जी आपली समजूत, ती खरी नसून ते युद्धाच्या सुरवातीपासून प्रतिबंधांतच होते. आणि परवां महाराज संजीवनालयांत आले—

दीनदासः—काय सांगतोस ? महाराज संजीवनालयांत ?

आनंदाः—भाईजी ! गांधारदेशचे वीरसेन ते महाराजच होते ! चपापूं नका ! विजयस्तंभाजवळच्या परवांच्या शांततेच्या दरबारांत भाईजींचं दर्शन झाल्यापासून महाराजांचं चित्त भारल्यासारखं होऊन, ते तिथं छद्मवेषानं आले होते. आणि त्यांनीं भाईजींजवळ एकांतांत स्वामिजींचं शुभ वर्तमान म्हणून सांगितलं, तें त्यांच्या मुक्ततेचं होय.

दीनदासः—थांब आनंदा ! तुझ्या तोंडून निघणारे शब्द वस्तुतः शुभदायक असून, प्राण हिरावून घेतलेल्या प्रेतासारखे मला वाटतात ! भेसूर काळदूतानं यमलोकचं भयाण वर्तमान सांगावं, तसे तुझे शब्द येतात ! बर्फाच्या तुषारांनीं भरलेल्या वाऱ्याप्रमाणं ते कानांत घुसून—त्या-योगानं माझं काळीज चर्रर्र होत आहे !

आनंदाः—भाईजी ! चित्ताची चलबिचल होऊं देऊं नका ! बाप्पाजी शांत झाले आहेत ! आणि आपणांलाही चित्त शांत ठेवण्याविषयीं त्यांचा आदेश आहे. आपणाला बलात्कारानं मुक्त करण्यासाठीं दुर्गाकडं चाललेल्या प्रक्षुब्ध लोकांना शांत करावं, म्हणून स्वामिजी मुक्त होतांच, तांतडीनं लोकांच्या मागोमागच दुर्गाकडं आले; पण सेनापतींच्या सैनिकांकडून त्या सर्वांची—हो, सर्वांची कत्तल होऊन तिच्यांतच—

दीनदासः—कत्तल ? लोकांची कत्तल ? प्रजेची कत्तल ? स्वामिजींची ? बाप्पाजींची ?—परमेश्वरच या राज्यांतून नाहींसा झाला काय ? राजा ! राजा ! विलासांत धुंद राहून तूं राजधर्म सोडलास, म्हणूनच अधर्म बोकाळून हें कलीचं साम्राज्य इथं झालं ! माझ्या बाप्पाजींची ?—जगांतील एका सत्त्व-

शील साधूची ?--राजा! आतां तुझी उपेक्षा करून सोय नाहीं. कुठं आहे तो राजा ? आनंदा, मला तो राजा दाखीव ! चल !

**आनंदाः**—भाईजी ! भाईजी ! असा भलताच विपरीत समज करून घेऊं नका. माझं पुरतेपणीं ऐका !

**दीनदासः**—छेः ! आतां सर्व निर्बंध, सर्व मर्यादा सुटल्या! आतां या दीनदासाला एकच कार्य! राजा! राजा! या कलीच्या साम्राज्यांत देखील तुला मी देवाचं नांव घ्यायला लावीन ! [ तीरासारखा जातो.

**आनंदाः**—भाईजी ! भाईजी ! [याप्रमाणें हांका मारीत मागोमाग जातो.

---

## प्रवेश तिसरा.

[ **स्थळः**—राजधानींतील मध्यवर्ती चांदणीचौक. मिरवणूक पहाण्यासाठीं जमलेला जनसंमर्द मिरवणुकीच्या मार्गावर दुतर्फा जात येत आहे. चौकांतील प्रासादांच्या गवाक्षांतून व सज्जांतून-विशेषतः स्त्रिया व मुलें यांची खेंचाखेंच. चौकाच्या मध्यमार्गीं असलेल्या ध्वजस्तंभाच्या चबुतऱ्यावर कत्तलींत घायाळ झालेल्यांच्या विधवा, वृद्ध मातापितरें, पोरकीं लेंकरें हीं बसविलेलीं असून त्यांची व्यवस्था **काकाजी** पहात आहेत. **कोतवाल** व **रक्षक** जनसंमर्दाची व्यवस्था ठेवीत असून मिरवणुकीचा मार्ग रक्षीत आहेत. 'स्वामी विश्वानंदजीकी जय!' असा घोष पर्जन्यसरीप्रमाणें चौकापर्यंत येऊन सर्वत्र पसरतो. चौकांतील निरनिराळ्या ठिकाणीं भिन्न भिन्न वृत्तींच्या व पंथांच्या लोकांचे समूह आपआपसांत चर्चा करीत असतात.]

[ कांहीं **ग्रामवासी** घोष ऐकून ]

**एक ग्रामवासीः**—मिरवणूक तर निघाल्यासारखी दिसते ! पण दीनदासजी आले का ?

**दुसरा ग्रामवासीः**—अर्थात् आलेच असले पाहिजेत.

**एक ग्रामवासीः**—चला, आपण मोतीरामानाच गांठून त्यांना विचारूं.

**दुसरा ग्रामवासीः**—ते तर कत्तलींतल्या जखमांनीं अगदीं घायाळ होऊन पडले आहेत ना ?

**एक ग्रामवासीः**—पण ते मिरवणुकीला आले आहेत. चला, आपण

त्यांना गांठूं. [ जातात. पुन्हा घोष. एका कोंपऱ्यांत बुरखा घेतलेली एक स्त्री उभी असून तिच्याकडे मिरवणुकीच्या बाजूनें दुसरी एक बुरखा घेतलेली स्त्री येते.]

**दुसरी स्त्रीः**—( पहिलीस हलक्या स्वरांत ) बाईसाहेब, संधि तर नामी आहे ! स्वामींच्या रथापुढं एका बाजूला महाराज असून, दुसऱ्या बाजूला वत्सलादेवी आहे. आपणाला रथाच्या मागच्या बाजूला सहज छपून राहतां येईल. पण बाईसाहेब, मन खंबीर आहे ना ?

**पहिली स्त्रीः**—या मायावतीला प्रभे, हा तूं प्रश्न विचारतेस ?

**प्रभाः**—सेनानायकांनीं बजावून विचारायला सांगितला, म्हणून—

**मायावतीः**—हंः ! भारतवर्षाच्या त्या भ्याड भागूबाईला साजण्यासारखाच तो आहे ! आपला तोरा हिरावून घेऊन आपणाला लज्जित करणाऱ्या महाराजांचा सूड उगविण्याचं काम, भारतवर्षाचे हे विजयी सेनानायक, एका खण्डिता झालेल्या स्त्रीचा राग प्रदीप्त करून, तिला सांगतात ! पाप कुणाला भागूबाई करीत नाहीं ? कंस-रावणादिकांसारखे असुर असोत वा इंद्रासारखे देव असोत ! पण या मायावतीला काय डर ? पण प्रभे ! लक्षांत ठेव, त्या भ्याड भागूबाईसाठीं ही मायावती महाराजांचा सूड उगवील, असं तूं समजूं नकोस. केवळ पाशवी सामर्थ्यानं दुसऱ्यावर जुलूम करणाऱ्या भ्याडांना दुसऱ्याच्या हृदयाचा–त्यांतून स्त्रीहृदयाचा ठाव कधींच कळणार नाहीं. ज्यांच्यावर प्रेम त्यांचा सूड ? त्या प्रेमाची सत्ता हिरावून घेणारी–या मायावतीहूनही मायावी–ती कवटाळीण वत्सलामाई–तिचा–तिचा सूड घेण्यासाठीं–पण चल, प्रभे ! या फुरफुरणाऱ्या हातांना आतां वाचाळ जिभेची वटवट सोसवत नाहीं ! [ जातात.

[ पुन्हा घोष. तो ऐकून कांहीं **दरबारी** ]

**एक दरबारीः**—काय हो, हें काय खूळ आहे ? त्या गोसावड्याच्या प्रेताचीच मिरवणूक काय काढताहेत ! महाराजांना वेड तर लागलं नाहीं ? आपल्याच हातानं सगळा राजेपणा दवडून—

**दुसरा दरबारीः**—भारतवर्षाच्या सिंहासनाची तरी कांहीं चाड ? शांततेचा तो दरबार उधळल्यापासून जसे कांहीं चळल्यासारखे झाले आहेत ! हंः ! इतकं दुबळं मन ? राजे लोकांना इतकं दुबळं मन शोभत नाहीं !

**तिसरा दरबारीः**—त्यावेळीं ताईसाहेबांकडं पाहुणे म्हणून गेले—एवढ्या भारतवर्षाचे महामंडलेश्वर !—पण जसा कांहीं एखादा फटिंग ! बरोबर लवाजमा नाहीं, कांहीं नाहीं !

**एक दरबारीः**—हेराध्यक्ष सांगत होते, तिकडं रानांवनांतून एखाद्या बावचळलेल्या पिसाटासारखंच करीत होते !

**दुसरा दरबारीः**—तिथून म्हणे एकदम त्या संजीवनालयाकडं गेले !

**तिसरा दरबारीः**—आणि तिकडून जे एक दिवशीं परत आले, ते पिशाच्च मागं लागल्यासारखे उघडेन् बोडकेच !!!

**एक दरबारीः**—परवां कत्तलीच्या तिथं गेले होते, ते तरी काय ? एकटेच ! आणि आपणच म्हणे सगळ्यांना पाणी पाजीत होते ! अरे, हा काय आमचा राजा ? छे, छे, छे, छेः ! परदेशचे वकील अन् दरबारी यांच्यापुढं शरमेनं माना खालीं घालाव्या लागतात कि हो !

**दुसरा दरबारीः**—आणि त्यामुळं लोक काय शेफारून गेलेत ! अगोदरच त्या दीनदासानं—न्—त्यांत आणखी ही फूस ! पहा ! पहा ! ते पहा कसे फुशारून छाती वर काढून चाललेत ! आम्हां दरबारी लोकांना बाहेर तोंड दाखवायची कि हो चोरी झाली ! हेंच पहाना ! जो माणूस भयंकर म्हणून इतके दिवस सरदार-मंडळानं मुद्दाम प्रतिबंधांत ठेवला होता; तो अनायासं कत्तलींत खपला, तर त्याचाच म्हणे गौरव !

**तिसरा दरबारीः**—छेः ! हीं सारीं अराजकतेचीं चिन्हं !

**एक दरबारीः**—पण खुद्द राजानंच अराजक करायचं ?

**दुसरा दरबारीः**—कां बरं, राजानंच काय पाप केलं ?

**एक दरबारीः**—मग याला राजाचं बंड म्हटलं पाहिजे !

**दुसरा दरबारीः**—हो ! सगळ्यांनीं बंड करावींत, आणि राजानंच करूं नये, हा कुठला न्याय ?

**एक दरबारीः**—करा बाबा ! न्यायाचाच् हक्काचाच प्रश्न असेल, तर राजानं बंड करा ! बायकांनीं मिशा ठेवा ! पुरुषांनीं गर्भार रहा !

**तिसरा दरबारीः**—तसं नव्हे ! महाराज यानं रामराज्य स्थापन करणार !

**एक दरबारीः**—रामराज्य ! म्हणजे माकडांचं राज्य ! हातांत कोलीत दिलं कि लंका !

**प्रागजीशेटः**—( गर्दीतून येऊन ) अरे मेरा बाप ! असं अभद्र बोलूं नको ! पुन्हा युद्ध होणार, म्हणून सामुग्रीचीं कोठारंच्या कोठारं भरून ठेवलीं आहेत ! आणि अजून पहिल्या युद्धसामुग्रीचा पैकाही सरकारांत अडकून पडला आहे !

**दुसरा शेटः**—सारीं क्रीडामंदिरन् कलावंतखातींच बंद करून टाकलीं ! आतां आम्हीं उदीम काय करावा ? उंची उंची विलासाचे जिन्नस कवडी-मोल झाले !

**एक दरबारीः**—कुणी विकत घेईल तर कवडी तरी किंमत येईल; पण या अराजकतेंत लूटच झाली, म्हणजे मोल नाहीं तें नाहीं, वर जिवाचं कडतं घ्यावं लागेल !

**प्रागजीशेटः**—मेरा बाप ! माझ्या कर्जाऊ रकमाही सरदार-मंडळाकडं अडकून राहिल्या आहेत! दोन दोन टक्क्यांनं लोकांच्या काढून की हो दिल्यात!

**दुसरा शेटः**—पिढ्यान् पिढ्याचे आम्ही सरदारांचे आश्रित ! आतां कांहीं धडगत दिसत नाहीं !

**एक दरबारीः**—कां ? सरदार-मंडळ आजच देशोधडीला लागलं की काय ? सेनापति उग्रसेन आमचे कैवारी आहेत ! परवां कत्तलींत त्यांनीं आपलं उग्ररूप थोडंसं दाखवलंच आहे—

**दुसरा शेटः**—अहो, त्या कत्तलीनंच तर महाराज न् लोक फार खवळून गेले आहेत ! खुद्द सेनापतींच्या सैन्यांतले सैनिक देखील त्या कत्तलीनं हवालदिल् झाले आहेत म्हणे !

**दुसरा दरबारीः**—कोण ? ते परवां युद्धाच्या भरताडासाठीं जमा केलेले बाजारबुणगे ? त्यांना कोण विचारतो ! सरदारमंडळाचे अस्सल क्षत्रिय कांहीं नामशेष झाले नाहींत ! सेनापतीसाहेबांचा या पुढचा डाव कांहीं औरच आहे ! साऱ्या सरदार-मंडळाला कालियाडोहाजवळील आपल्या दुर्गाकडं त्यांनीं जमा व्हायला सांगितलं असून—

**तिसरा दरबारीः**—अमात्यही तिकडंच गेले आहेत म्हणे !

**दुसरा दरबारीः**—आपल्यालाही तिकडंच जायचं आहे. या बाजार-बुणग्यांच्या या खेळाशीं आपल्याला काय करायचं आहे ? चला !

[ जातात. पुन्हा घोष. तो ऐकून कांहीं नागरिक]

**एक नागरिकः**—हंः ! ही मिरवणूक म्हणजे निव्वळ ढोंग आहे ! जिवंतपणीं हालहाल करून उपाशीं मारायचं, आणि मग मात्र यथासांग–पिंडतर्पण–नदीकांठीं–चारचौघांत–चव्हाट्यावर जाऊन करायचं ! हें पहा ! हें पहा ! हें ध्वजस्तंभाच्या चबुतऱ्यावर कसं प्रदर्शन मांडलं आहे !

**दुसरा नागरिकः**—हे कोण लोक इथं मुद्दाम व्यवस्थेनं बसवलेत ?

**एक नागरिकः**—अहो, हे कत्तलींत पडलेल्या लोकांचे आप्तेष्ट !

**दुसरा नागरिकः**—हे कशासाठीं इथं बसवलेत ?

**एक नागरिकः**—अहो, त्यांच्या समोर चारचौघांत डोळ्यांतून घळघळ वाहणाऱ्या अश्रूंनीं तर्पण करायचं असेल ना ? राजनीतिशास्त्रांत त्यांना नक्राश्रू म्हणतात, नाहीं का ?

**दुसरा नागरिकः**—राजकारणांत कोणी असे अश्रू ढाळायला लागला कीं बेलाशक समजावं–निव्वळ ढोंग—दांभिकपणा आहे हा !

**मोतीरामः**—( काठीच्या आधारावर घायाळ स्थितींतच एकदम पुढें येऊन ) कोण याला दांभिकपणा म्हणतो ? महाराजांचं हें ढोंग ? हरहर ! कोण असं म्हणतो ? कत्तलीचा तो हृदयविदारक देखावा आणि त्यामुळं विदीर्ण झालेलं राजहृदय हीं ज्यानं प्रत्यक्ष पाहिलीं आहेत; अंतकाळीं अमर झालेल्या स्वामिजींच्या निःसंदेह वाणीचे 'मोती ! हा पहा तुमचा राजा !' हे दैवी शब्द ज्यानं आपल्या कानांनीं ऐकले आहेत—ते शब्द कसे ? अमृताचे तुषार ! शतशः विदीर्ण झालेल्या दुबळ्या शरीराचे आणि हृदयाचे मर्मी घाय बुजवून टाकून आशेचं नवजीवन देणारे ! जणुं वर-प्रसादाची देववाणीच ! ते शब्द कानांनींच काय, रोमरोमीं भिनून आत्म्यानं पटवून घेतलेले–असा हा आत्मसाक्षात्काराचा साक्षीदार स्वामि-जींच्याच निःसंदेहवाणीनं तुम्हाला सांगतो, कीं हें ढोंग नव्हे !–हा दांभिक-पणा नव्हे ! हें आमच्या महाराजांचं सत्य–सत्य–त्रिवार सत्य–असं राजरूप आहे ! बोला ! महामंडलेश्वर कुमारसिंह महाराज की जय !

[ 'स्वामी विश्वानंदजी की जय !' असा घोष करीत मिरवणूक येते. रथावर कदलीपत्रांनीं शृंगारलेल्या मेघडंबरींत **स्वामिजींचा** पुण्यदेह पुष्प-हारांनीं मंडित असा. रथाच्या एका बाजूला महाराज **कुमारसिंह** व दुसऱ्या बाजूला **देवी वत्सलामाई** मागचे बाजूस राजसेवक चवऱ्या ढाळीत आहेत. मागें जनसंमर्द. प्रवेशानंतर पुन्हा घोष.]

**कुमारसिंहः**—कोतवाल ! दीनदासजी आले का ?

**कोतवालः**—अजून आले नाहींत सरकार. महाद्वारावर त्यांचेसाठीं स्वार ठेवले असून, येतांक्षणींच ते त्यांना इथं घेऊन येतील. सम्राटांच्या आज्ञेप्रमाणं कत्तलींत स्वर्गस्थ झालेल्यांचे आप्तेष्ट हे या इथं बसविले आहेत सरकार.

**कुमारसिंहः**—(देवी वत्सलामाईकडे वळून) देवी ! या दुःखितांचं सांत्वन या राजाच्या हातून होईल काय ? कोणाचे पति, कोणाचे पुत्र, कोणाचीं मातापितरं, कोणाचीं अर्भकं याच्याच मदोन्मत्त झालेल्या क्षात्र-तेजाला नाहक बळीं पडलीं. त्यांचं रक्षण करतां करतां त्यांच्याच बरोबर ज्यांनीं आपला स्वतःचा देह अर्पण केला, विश्वाचं दुःख निवारण कर-ण्यांत देह खर्चीं घालणं हाच ज्यांचा आनंद असे स्वामी विश्वानंदजीच काय ते यांचं सांत्वन करूं शकले असते. या सुखलोलुप राजाच्या नुसत्या कोरड्या शब्दांनीं तें कसं व्हावं ?

**वत्सलामाईः**—पण महाराज ! साऱ्या भारतवर्षाचं दुःख आपल्या माथीं घेऊन स्वामिजींनाच आपण अमर केलं आहे ! खुद्द त्यांनींच आपल्या दिव्यवाणीनं हें सांगितलं नाहीं काय ?

**कुमारसिंहः**—( चबुतऱ्यावरील एका विधवेजवळ जाऊन ) माते ! शोक करूं नको ! तुझा पति, मदांध झालेल्या भारतवर्षाच्या पाशवी शक्तीला पापाची धडकी भरवून, भ्याड आणि निःसत्त्व करण्यासाठीं स्वामिजींबरोबर बळी पडून, पुण्यलोकाला गेला आहे ! त्या पुण्यलोकाला जाण्याचा पहिला धडा या तुमच्या राजाला तुम्हांला घालून देतां आला नाहीं, यानं तो अति कष्टी होऊन एखाद्या अपराध्याप्रमाणं यावेळीं तो तुमच्यापुढं आला आहे. वृद्ध मातापितरहो ! पोरक्या झालेल्या माझ्या लहानग्या अर्भकांनो ! तुमच्या जिवलगांनीं आपल्या देहाच्या आहुति देऊन ज्या यज्ञाला आरंभ केला आहे, त्यांत आतां यापुढं तरी स्वतांची पहिली आहुति दिल्यावांचून पश्चात्तापानं पोळलेल्या या राजाच्या मनाची शांति होणार नाहीं.

**एक वृद्धः**—नाहीं, नाहीं, नाहीं, नाहीं, नाहीं ! देवा नारायणा ! माझ्या या रामराजाला उदंड आयुष्य दे ! माझ्या बाळासाठीं माझा राजा इळहळतो ? बाळा ! धन्य रे तुझ्या जन्माची ! केवढं भाग्य ! मरून जन्माचं

सार्थक केलंस! राजा! माझ्या राजा! तुझी पहिली आहुति? अरे, ती पडण्यापूर्वीं आम्हां साऱ्या आबालवृद्धांच्या उड्या किरे पडतील! साऱ्या भारतवर्षाचं आयुष्य तुला मिळून तुझा निरंतर विजय होवो!

**मोतीराम**:—बोला! महामंडलेश्वर कुमारसिंह महाराज की जय!

[ **दीनदास** त्वेषानें प्रवेश करतो.

**दीनदास**:—कोण या असल्या अधमाधम राजाचा जयजयकार करतो? ज्यानं आपला राजधर्म सोडला, त्याचा जयजयकार? विलासांत लोळत राहिल्यामुळं ज्याची पाशवी शक्ति इतकी बेताल-धुंद-मदोन्मत्त झाली, कीं आपल्याच निःशस्त्र प्रजेवर-इतकंच काय, पण शांतिब्रह्म अशा एका सत्त्वशील साधूवर हात टाकायला-( शोकावेगानं स्वामिजींच्या पुण्यदेहावर डोकें टेंकतो ) बाप्पाजी! बाप्पाजी! केवळ या अधमाधम राजामुळं किहो तुमचा हा असा अमानुषपणानं शेवट झाला! तुमचा सारा सत्त्वशील-पणा या उन्मत्त असुरांपुढं वायां गेला! सांगा, बाप्पाजी! सांगा! तुमचं शांतिब्रह्म देखील त्यावेळीं या अमानुषपणानं खवळून गेलं कीं नाहीं, सांगा!-

**वत्सलामाई**:—नाहीं बरं, भाई दीना! नाहीं. उलट त्या हतभागी मूढांच्या अघोर पापाबद्दल मी देवाजवळ क्षमा मागायला जातों, असंच ते म्हणाले. आणि तूं क्रोधाच्या आधीन होशील—

**दीनदास**:—मग काय? माझ्या बांधवांची-आपल्याच केवळ पुत्रवत् अशा प्रजेची कत्तल या उन्मत्तांनीं-क्रूर पशूहूनही अधमाधम अशा या राजानं-छेः, छेः! राजपद केवळ भ्रष्ट करणाऱ्या या चांडाळान केली असतां -माझ्या बाप्पाजींचा हा पुण्यदेह या दुष्टांनीं असा निर्दयतेनं छिन्नभिन्न केलेला मी या डोळ्यांनीं पहात असतां मी शांत राहीन काय? हृदयांत क्रोधाच्या ज्वाला सारख्या भडकल्या असून त्यांत या सर्वांचा केव्हां स्वाहा करीन, असं मला झालं आहे. चल! राजा! या पेटलेल्या अग्निकुंडांत पहिली आहुति तुझी पडली पाहिजे!

**कुमारसिंह**:—भारतवर्षाची मदान्ध झालेली पाशवी शक्ति निर्मूल करण्यासाठीं हा भारतवर्षाचा राजा आपली पहिली आहुति द्यायला तयारच आहे! या सर्व लोकांसमक्ष त्यानं आतांच तशी प्रतिज्ञा केलेली आहे! पण दीनदासजी, ती आहुति अशा रीतीनं देऊन—

**दीनदासः**—दरबारी भाषेचं अवडंबर माजवून भुरळ पाडणाऱ्या दांभिका ! या दीनदासाची तलवार एका भ्याड नामर्दावर पडली, असा तिला कलंक लावूं नकोस ! चल, उपस तलवार !

**वत्सलामाईः**—( मध्यें त्याच्या समोर येऊन ) दिना ! दिना ! काय हें ? बाप्पाजींच्या पुण्यदेहासमोर हा अन्याय ? महाराजांचं खरं रूप—खरं हृदय तुला समजलं नाहीं.

**दीनदासः**—आणि तुला तें समजलं, होय ? म्हणून तूं त्याचा कैवार घेतेस ? तुझ्या रूपानं भाळलेल्या या विलासी महाराजावर तूंही—

**मोतीरामः**—( एकदम पुढें येऊन ) खबरदार, भाईजी ! तोंड संभाळून बोला ! माईजींच्या पावित्र्याचा उपमर्द करायला तुमची जीभ चळली ? आतां एक रेसभर अधिक चळूं द्या,—तिचे तुकडेन् तुकडे हा तुमचा मोत्या केल्याखेरीज रहाणार नाहीं ! क्रोधानं इतके अंध झालांत ? मूढ बनून तुमची सारी मति भ्रष्ट—नष्ट झाली काय ? तिचा थोडासा अंश जरी शिल्लक राहिला असेल, तरी तेवढाच जरा महाप्रयासानं जागा ठेवून हा मोत्या काय सांगतो, तें नीट ऐकून घ्या. आमच्या महाराजांचं खरं रूप आजपर्यंत काळयाकुट्ट ढगांनीं व्यापलेलं होतं. तें आम्हाला कुणालाच आजपर्यंत समजलं नाहीं.

**दीनदासः**—मोती ! तूं असं म्हणतोस ?

**मोतीरामः**—मी ? खुद्द बाप्पाजींनींच अंतकाळीं साक्षात्काराच्या वाणीनं तें सांगितलं. आणि दिव्यदृष्टि देऊन तत्काळ आम्हांला त्या स्वरूपाचं दर्शनही घडवलं.

**दीनदासः**—महाराजांचा जन्माचा हाडवैरी तूं—तुझ्या तोंडून हे शब्द !

**मोतीरामः**—कत्तलीचा तो देखावा पाहून महाराजांचं हृदय किती शुद्ध भावानं कळवळलं, भारतवर्षाच्या सर्व गांजणुकीचं पाप बाप्पाजींच्या दिव्य आत्म्यासमोर किती लोकोत्तर धैर्यानं महाराजांनीं आपल्या माथीं घेतलं, हें या मोत्यानं आपल्या डोळ्यांनीं पाहिलं आहे. आणि त्या प्रसंगीं दिव्य लोकाप्रत चाललेल्या स्वामिजींनीं प्रसन्न वाणीनं सांगितलेले 'मोती ! हा पहा तुमचा राजा !' हे शब्द या कानांनीं ऐकले आहेत. या उप्परही या

मोत्याच्या हाडांत वैर राहिलं असेल, तर क्रोधानं उपसलेल्या आपल्या तलवारीनं या हाडांचाच चुराडा करून टाकणं योग्य आहे.

एकवृद्धः—दीनदासा! या वृद्धाचा एकच एक आधार, या म्हाताऱ्याची काठी, माझा एकुलताएक कर्ता बाळ परवांच्या कत्तलींत तुझ्या बाप्पाजीं-बरोबर बळी पडला आहे. पण या म्हाताऱ्याला दुःख होत आहे तें हेंच कीं, या माझ्या राजासाठीं आपलं आयुष्य द्यायला याला आणखी पुत्र नाहींत. दीनदासा! या राजाची आहुति मागतोस? अरे, या राजासाठीं कत्तलींत पडलेल्यांचे हे सारे जिव्हाळ्याचे जिवलग आपल्या पहिल्या आहुति देतील! का? मी बोलतों तें खरं कीं नाहीं? तर मग बोला! सम्राट् कुमारसिंह महाराज की जय! ( जयजयकार. )

दीनदासः—काय? 'स्वामिजी विजयी झाले आहेत—त्यांचा आश्रम—त्यांचा सांप्रदाय विजयी झाला आहे?' आनंदा! या तुझ्या शब्दांचा अर्थ हा असा आहे काय? मोती! केवळ क्रोधानं मूढ होऊन मीं महा-राजांना राजपद भ्रष्ट करणारे चांडाळ म्हणून म्हटलं! आणि माझ्या ताईला—तुझ्या माईला—बाप्पाजी! तुमच्या या पुण्यदेहाचं अखेरचं दर्शन घेत असतांही मीं क्रोधवश होऊन माझी मति, माझी वाणी भ्रष्ट केली! आणि तुमच्या पुण्यात्म्याला या पुत्रानंच परमावधीचं दुःख दिलं! याला क्षमा करा. मोती! तुझ्या माईच्या मुखाकडं पहाण्याचं धैर्यच मला होत नाहीं. महाराज! तुमचा सर्वस्वी अपराधी असा हा दीनदास तुमच्या चरणापाशीं लीन झाला आहे. याला जें शासन कराल, तें भोगायला हा तयार आहे.

कुमारसिंहः—दीनदासजी! स्वामिजींच्या या पुण्यदेहासमोर हा कुमारसिंहही अद्याप स्वतःच अपराधी म्हणून उभा आहे. तो आपणाला शासन काय करणार? आपण क्षणमात्रच केवळ क्रोधाच्या आधीन झालांत; पण हा कुमारसिंह आपल्या सिंहासनाला सर्वकाळ सत्तेची सुख-शय्या मानून मोहनिद्रेच्या आधीन झाला होता. आपणांप्रमाणं स्वामिजींच्या गुरुकृपेचा लाभ प्रत्यक्ष या कुमाराला घडला नाहीं. पण त्यांच्या सामर्थ्यानं निर्माण झालेल्या संजीवनालयांतील अमृतांजनानं त्या मोहनिद्रेंतून तो आतां जागा झाला असून, आपल्या पापाचं प्रायश्चित्त पुरं करण्यासाठीं

तो आपल्याकडून धडपडत आहे. पण दरबारी कुटिल राजनीतिच्या काळ्या कर्दमांत पोसलेला हा राजा–त्याच्यावर त्याच्या प्रजेचा विश्वास बसावा कसा ? दरबारचं सारं मंडळ तर हा राजा बंडखोर झाला, असं म्हणूं लागलं आहे. अशा स्थितींत प्रजेच्या विश्वासाला तो पात्र झाला नाहीं, तर तो राजा कसला आणि शासनकर्ता शास्ता तरी तो कसा होईल ?

**मोतीराम:**—कां बरं ? स्वामिजींनीं आमचा राजा आम्हांला दाखवून दिलेला आहे !

**कुमारसिंह:**—सांवता माळ्यासारख्या भगवद्भक्तांनीं भांगेतील तुळस ओळखली, तरी सर्वांना ती पटल्याशिवाय जनार्दनस्वरूपी पांडुरंगाच्या कंठीं ती विराजमान होईल काय ? टांकीचे घाव सोसून भक्तांच्या भक्तीला पात्र झाल्याखेरीज काळ्या खाणींतला दगड देव होऊं शकत नाहीं.

**दीनदास:**—महाराज ! विश्वाचा आनंद-केवळ विश्वाचं हृदय असलेल्या स्वामिजींनीं आपणाला हे राजपद दिलेलं असून, या सर्व लोकांच्या हृदयाच्या सिंहासनावर आपण विराजमान झाल्याचं या दीनदासानं आतां प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिलं आहे.

**कुमारसिंह:**—पण आपल्यासारख्या लोकांचं हृदय जाणणाऱ्या–लोकांच्या विश्वासाला आणि प्रेमाला पूर्ण पात्र असलेल्या लोकनायकांचा पाठिंबा या राजाला आहे, याची आणभाक स्वामिजींच्या पुण्यदेहासमोर सर्वांसमक्ष जाहीर झाल्याखेरीज या राजाला आपलं बंड कधींही यशस्वी आणि मंगलदायी करतां येणार नाहीं.

**दीनदास:**—ती आणभाक मोठ्या आनंदानं घ्यायला हा दीनदास तयार आहे. माझे भारतवासी बांधवहो ! ऐका ! आमच्या महाराजांनीं आपल्या वंशपरंपरागत वैभवाचा, सत्तेचा आणि सर्वप्रकारच्या सुखाचा त्याग करून केवळ आपणां प्रजेसाठीं खरोखरच अश्रुतपूर्व अशा एका बंडाची ध्वजा उभारली आहे ! तें बंड यशस्वी करण्यासाठीं हा तुमचा दीनदास महाराजांच्या चरणीं आपलं सर्वस्व वेंचायला–आपली आहुति द्यायला तयार आहे, अशी तो यावेळीं आपणां सर्वांसमक्ष, या माझ्या परमपावन पित्याच्या चरणांवर–या कार्यासाठींच ज्यांनीं आपला बळी

पूर्वीच दिलेला आहे,–त्यांच्या चरणांवर हात ठेवून आणभाक घेत आहे. बोला ! याला आपली मान्यता आहे ना ?

**मोतीराम**:—तर मग बोला ! आमचे सम्राट् कुमारसिंह यांच्या या बंडाचा जयजयकार असो !

[ जयजयकार. आंतून प्रतिजयजयकार करीत कांहीं सैनिक येतात.]

**सैनिक**:—महाराज ! आपले हे सैनिक आपल्या चरणापाशीं आले आहेत. सेनापतीसाहेबांनीं प्रजेची जी नाहक कत्तल केली, ती त्यांनीं आपल्या खास तैनातींतील अस्सल म्हणविणाऱ्या क्षत्रियांकडून करविली. बाकीच्या सर्व सैनिकांना त्याबद्दल हळहळ वाटत असून ते फार हवालदिल होऊन गेले आहेत. सेनापति आमच्याकडूनही असलं पापाचरण करवतील कीं काय, अशी त्यांना धास्ती वाटत असून, महाराजांच्या चरणांशीं याची खातरजमा करून घेण्यासाठींच ते या वेळीं आले आहेत. सेनापतींनीं सर्वांना आपल्या कालियाडोहाजवळील खास दुर्गापाशीं एकत्र होण्याचे हुकूम सोडले असून, त्यांचं धोरण कांहीं वेगळंच दिसत आहे. आणि म्हणून तर आम्हाला फार चिंता वाटत आहे.

**कुमारसिंह**:—होय, या भारतवर्षाच्या राजानं आपल्या परंपरागत राजकीय सत्तेच्या विरुद्ध बंड उभारलं आहे, असं सेनापति आदिकरून सरदार-मंडळानं ठरवलं असून त्या बंडाचा मोड करण्यासाठीं ते आम्हांवर चाल करून येणार आहेत.

**दीनदास**:—या राजाच्या बंडांत आम्ही भारतवासी सर्व प्रजाजन सामील झालों असून, आमच्या महाराजांसाठीं आम्ही आपले प्राण द्यायला तयार आहोंत.

**सैनिक**:—आम्हीही महाराजांचेच सैनिक आहोंत. जिथं महाराज तिथं आम्ही !

**मोतीराम**:—बोला, सम्राट् कुमारसिंह महाराज यांच्या या बंडाचा जयजयकार असो !

**कुमारसिंह**:—तुमच्या या निष्ठेनं आम्ही कृतार्थ झालों–आमचं बंड यशस्वी झालं ! सरदार-मंडळानं आपल्या पोलादी मुठीनं तुम्हांला खालीं वांकवून तुमच्या मानेवर स्थापलेलं जुलमी सिंहासन लाथेनं झुगारून देऊन

तुमच्या हृदयाचं प्रेमाचं सिंहासन आपलंसं करावं, हेंच काय तें आमचं बंड! तें आमचं बंड यशस्वी झालं–आम्ही कृतार्थ झालों!

एक दूतः—( धांपा टाकीत प्रवेश करून ) महाराज! राजभगिनी कमलादेवी ताईसाहेबांवर सेनापतींनीं अचानक घाला घातला असून ते त्यांना घेऊन कालियाडोहाजवळील आपल्या खास दुर्गाकडे गेले आहेत. ही वर्दी महाराजांच्या कानांवर घालण्यासाठीं अमात्यांनीं मला इकडं पाठविलं असून, स्वतः अमात्य सेनापतीसाहेबांची कानउघाडणी करण्यासाठीं तिकडं गेले आहेत.

वत्सलामाईः— अगबाई,आतां हा बेफाम झालेला राक्षस ताईसाहेबांची–

दीनदासः—माई, स्वस्थ रहा. कमलादेवी ताईसाहेब म्हणजे केवळ असहाय्य स्थितींत सांपडलेली वीरनवालीसारखी दुबळी गाय नव्हे. नवग्रहांना पलंगाखालीं कोंबून ठेवणाऱ्या रावणाला देखील आपल्या पूर्ण कह्यांत सांपडलेल्या सीतादेवीच्या केंसाला धक्का लावतां आला नाहीं. त्या दुष्टाचे पापाचे घडे आतां भरत आले आहेत! महाराजांची आज्ञा व्हावी; या सैनिकांना बरोबर घेऊन हा आतांच मी तिकडं जातों आणि ताईसाहेबांची ताबडतोब मुक्तता करून त्यांना इकडं घेऊन येतों. या दुष्टांचं निर्मूलन झाल्याखेरीज महाराजांचं हें बंड यशस्वी झालं, असं म्हणतां येणार नाहीं.

कुमारसिंहः—दीनदासजी, स्वामिजींच्या पुण्यदेहाला यथाविधी संस्कार त्यांच्या पुत्रानं—

दीनदासः—आपणांसारखे त्यांचा सांप्रदाय चालविणारे समर्थ राजेच स्वामिजींना पुत्राच्या ठिकाणीं झाले आहेत. मग त्यांच्या देहाला यथाविधी संस्कार आपणाहून अधिक—

कुमारसिंहः—पण हें दुष्टांचं निर्मूलन करण्याचं कार्य आतां या राजानंच पुढाकार घेऊन प्रसंगीं आपला बळी देऊनही—

वृद्धः—नाहीं, नाहीं, नाहीं, नाहीं! महाराज, आम्ही असतांना आपणाला कसें जाऊं देऊं?

सैनिकः—महाराजांनीं अशा वेळीं पुढं व्हायचं, म्हणजे हा आम्हां सैनिकांचा अपमान आहे. दीनदासजी म्हणतात तेंच योग्य आहे.

कुमारसिंहः—ठीक आहे. तुमची मर्जी! आमच्या या बंडानं कुणाचा

रक्तपात अगर घातपात न व्हावा अशी–पण ती भाबडी आशा !–व्यर्थ दिसते ! जा दीनदासजी; पण पुण्याचा अधिकाधिक उत्कर्ष होऊन पाप केवळ आपल्या मरणानं मरावं, हें आमच्या बंडाचं स्वरूप आहे, हें लक्षांत ठेवून जें तुम्हाला प्रसंगीं उचित दिसेल तें करा.

[ पूर्ववत् जयजयकार करीत **दीनदास** व **सैनिक** जातात.

**मायावती**:—( महाराजांपुढें एकदम येऊन व बुरखा काढून ) सम्राट् कुमारसिंह महाराजांच्या या बंडाचा जयजयकार असो ! महाराज, पाप आपल्या मरणानं मरावं हें आपल्या या अपूर्व बंडाचं स्वरूप आहे ना ?

**कुमारसिंह**:—कोण, मायावती ?

**मायावती**:—होय. मग पापाला प्रवृत्त करणारं कारणही आपल्या या बंडांत मेलच पाहिजे !

**कुमारसिंह**:—होय. पुण्याचा जसजसा उत्कर्ष होईल, तसतशी सर्व प्रकारचीं पापबीजं मेलींच पाहिजेत !

**मायावती**:—मग या मायावतीच्या हृदयांत प्रेमाच्या जागीं द्वेषाची–या विषारी पापाची–प्रेरणा करणारी–महाराजांच्या मनाला भुरळ घालून तिथून या मायावतीला ढकलून देणारी ही कवटाळीण–तीही मेलीच पाहिजे !

[ खंजीर एकदम काढून वत्सलादेवीच्या अंगावर जाते.

**कुमारसिंह**:—हं, हं ! मायावती, हें काय ? ( असें म्हणत मायावतीला अडवायला जातात, तों खंजीराचा वार त्यांच्या खांद्यावर लागतो. त्यांना मूर्च्छा येते व वत्सलादेवी त्यांना सांवरते. मोतीराम आदिकरून 'अरे, कोण ही चांडाळीण ? ओढा ! मारा तिला !' असें ओरडतात. महाराज पडतां पडतां, 'खबरदार ! ती या सम्राटाची प्रजा आहे. तिच्या केंसालाही धक्का लावूं नका !' असें ओरडतात. ती तारवटल्यासारखी होऊन चोहोंकडे पहाते.)

**वत्सलामाई**:—मोती ! महाराजांना मूर्च्छा आली. त्यांना अगोदर वाड्यांत घेऊन चला. [ पडदा.

---

## प्रवेश चौथा.

[ **स्थळः**—कालियाडोहाजवळील सेनापतींचा विलासदुर्ग. आंतील पटांगण. **सेनानायक, सज्जनसिंह, शुंभसेन.** मद्याच्या सुरया वगैरे धारण करणारी छोकरी व तांबूलवाला छोकरा.]

**सेनानायकः**—काय म्हणे 'हा वणवा म्हणजे सेनानायक! तुम्हीं आपल्या हातानं पेटवलेली स्वतांची चिताच होय!' हं:! छोकरी! शराब लाव! जा थेरड्या! तुझ्यासारख्या मरतमढ्यांना आतां चिताच दिसायच्या! छोकरी! ही तुझी माध्वी सुरा आज अशी बेचव कां लागते? काय शुंभसेन! त्या थेरड्याला गिरफदार करण्यासाठीं मागोमाग स्वार रवाना झाले आहेत ना?

**सज्जनसिंहः**—सेनानायक! काय, आपण अमात्यांना गिरफदार करणार?

**सेनानायकः**—होय. छोकरा! तांबूल लाव! चांगलं सांगत होतों, कीं या बंडखोर राजाला पदच्युत करून या भारतवर्षाच्या वैभवशाली सिंहासनावर अमात्य, आम्ही आपणाला बसवतों—

**सज्जनसिंहः**—पण सेनानायक! यांत दुसरा कोणता नाहीं, तरी निदान बलाबलाचा तरी आपण विचार केला पाहिजे. महाराजाना 'बंडखोर!' म्हणून आपण कितीही कंठशोष केलात, तरी त्यांच्याभोंवतीं हां हां म्हणतां आम्हां सरदार-मंडळाखेरीज सबंध भारतवर्ष आज गोळा झालं आहे!

**सेनानायकः**—अं:! हें भय कुणाला घालतां? असंख्यात तारकांचं तेज एकट्या सूर्यापुढं काय होय? सबंध भारतवर्ष! हं:! ज्याचं नांव निघताच जगांतील राजे लोकांचीं सिंहासनं कंपायमान होतात, तो हा भारतवर्षाचा विजयी सेनानायक सरदार-मंडळाच्या बाजूला आहे! छोकरा! गौडीचा एक पेला भर!

**सज्जनसिंहः**—माफ करा सेनानायक! आपला पक्ष हा सत्पक्ष राहिला नाहीं. खोट्या अहंकारानं आपणाला पूर्णपणें ग्रासलं असून आपली बुद्धि नाशाच्या मार्गाला लागली आहे. ज्या अमात्यांनीं आपल्या आटोकाट शहाणपणानं आणि धोरणानं आपणां सरदार-मंडळाला हें वैभव प्राप्त करून

दिलं, ते यावेळीं खरोखर हिताचा मार्ग दाखवीत असतां, त्यांनाही आपण गिरफदार करायला उद्युक्त झालांत!–माफ करा! या सज्जनसिंहाला यापुढं आपल्या पक्षाचा आश्रय धरणं धोक्याचं वाटतं. हा त्याचा आपल्याला अखेरचा रामराम!

**सेनानायकः**—ठीक आहे! त्या थेरड्याला चिता दिसली, आपणाला राम म्हणावासा वाटतो! कोण आहेरे तिकडं? (दूत येतात.) या सज्जनसिंहाना कालियाडोहांत कंठस्नान घाला! समजलं का? त्यांना 'राम' म्हणायचं आहे! चांगलं शुचिर्भूत होऊन 'राम' म्हणूं द्या बरं!

[दूत त्यांस पकडून नेऊं लागतात.

**सज्जनसिंहः**—(जातां जातां) सेनानायक! 'राम' म्हणतां म्हणतां मृत्यूच्या स्वाधीन होणं हें कोणालाही भाग्याचंच मरण आहे! पण ज्यांचा डंका विजयी सेनानायक म्हणून त्रिभुवनांत गाजला, त्या तुम्हाला हा अखेरचा भाग्याचा 'राम' म्हणायची देखील ऊर्जा रहाणार नाहीं! तुमच्या हाताखालच्या यःकश्चित् शिपुड्यांलाही ज्या धारातीर्थानं सद्गति दिली, त्या पवित्र तीर्थाला तर तुमच्या पापाची शिसारीच आली; पण आतां तुमचं स्वतःचं मनही त्या पापानं इतकं दुबळं–कमकुवत होत चाललं आहे, कीं ऐन वेळीं तें तुम्हाला दगा देऊन अखेरीस तुमच्या कपाळीं कुत्र्याचंसुद्धां नव्हे, तर त्याहूनही निंद्य–सर्वथैव त्याज्य–किळसवाणं–हिडिस–असंभ्याड भागूबाईचं मरण आहे, हें लक्षांत ठेवा! [जातात.

**सेनानायकः**—हंः हंः हंः हंः! या भारतवर्षाच्या विजयी सेनानायकाचं चं मन म्हणे दुबळं होत चाललं आहे! आणि त्याला म्हणे मरण!– हंः हंः हंः हंः! मूर्ख! महामूर्ख! शतमूर्खांनो! याच खुषींत तुम्ही मरा! छोकरी! या गौडी सुरेलाही आज चव नाहीं! दोन्हींचा मिलाफ कर! शुंभसेन, आपण स्तब्ध कां? आपणही भ्यालात कीं काय?

**शुंभसेनः**—हं हं हं हं हं! आपण असल्यावर आम्हाला भय—

**सेनानायकः**—कसं बोललांत! घ्या, घ्या! हा मिलाफाचा–आपल्या दिलजमाईचा प्याला घ्या! छोकरी! सरदार शुंभसेनजी यांचा पेला मिलाफाच्या मद्यांनीं कांठोकांठ भर! शुंभसेनजी! आपणाला कुणालाही भिण्याचं, कुणाचीही पर्वा करण्याचं कारण नाहीं!



**सेनानायक** ( रा. शाळिग्राम ):—राजा म्हणजे नरपति ! नरसेवक नव्हे !

( पृ० ११९. )

**शुंभसेनः**—हं हं हं हं हं ! जगाची पर्वा न करितां—बस्स् सेनानायक ! कुणाचीही—देवाचीही पर्वा न करितां जगांत मन मानेल तसं राहतां येणं, म्हणजे स्वर्गसुख आहे, नाहीं ?

**सेनानायकः**—अलबत् ! आणि जग म्हणजे माणसांचं जग ! देवन् पशू काय ?—पशूंची कोणीच पर्वा करीत नाहीं. आणि देव तर काय बोलूनचालून मनाला मानेल तोच देव ! सत्ता भोगायचं खरं जग म्हणजे माणसांचं ! त्यांची पर्वा न करतां, त्यांना मन मानेल तसं बागवून त्यांच्यावर सत्ता मिरवीत रहाणं हेंच खरं स्वर्गसुख ! त्यासाठीं तर लढाया करून—सर्वांची हड्डी नरम करून—त्यांना केवळ गोगलगाय बनवून त्यांच्यावर आपली सत्ता अढळ करायची असते ! हीच खरी राजसत्ता ! म्हणे लोकानुरंजन करायचं ! जा, लोकांना आपल्या डोक्यावर घेऊन नाचा जा ! ही काय राजसत्ता ? ही त्या सत्तेची शुद्ध विटंबना ! तिच्या विरुद्ध हें बंड आहे ! राजा म्हणजे नरपति ! नरसेवक नव्हे ! आपले रथ, शिबिका माणसांच्या मानेवर चढवून त्यांत बसून मिरवीत राहील, तोच नरपति ! हीं मद्यपात्रं लाकडांच्या मेजावर काय म्हणून ठेवायचीं, हीं माणसं आमच्या ताब्यांत असतांना ? हीं चालतीं बोलतीं मेजं आपण जाऊं तिकडं आपल्याबरोबर येतील कीं नाहीं ? ही सारी सत्ता आम्हीं आपल्या विजयानं मिळविली असतां हा करंटा राजा लोकांना डोक्यावर घेऊन नाचतो ! आणि हा थेरडा अमात्य महाराजांचं खरं राजरूप प्रगट झालं म्हणतो ! होऊं द्या ! होऊं द्या ! पहातों कसं प्रगट झालं तें ! शुंभसेन ! ही मायावती अजून काय करते आहे हो ? हा बार जर बरोबर उडाला—( एक सैनिक येतो त्यास ) कायरे ? अमात्यांना गिरफदार करून आणलं कीं नाहीं ?

**सैनिकः**—नाहीं, सेनानायक !

**सेनानायकः**—नाहीं ? मग तूं जिवंत कसा ?

**सैनिकः**—आमची यांत कसूर नाहीं, सेनानायक ! आम्हीं दौड करून अमात्यांना गांठलं. इतक्यांत राजसैन्य घेऊन दीनदास अचानक तिथं येऊन ठेपला. आमची पंचवीस स्वारांची टोळी त्या सैन्यापुढं काय करणार ? जिवंत पायापाशीं आलों, ही या पायांचीच पुण्याई !

**सेनानायकः**—काय ? दीनदास राजसैन्य घेऊन—

**सैनिक**—होय सेनानायक. तो आपल्या दुर्गावर चाल करून येत आहे !

**सेनानायकः**—अस्सं काय ? ठीक आहे. दीनदासा ! गफलतीनं एकदां आमच्या तावडींतून निसटला होतास. पण आतां कुठं जाशील ? अरे, हा कोण येत आहे ? हा मायावतीचा स्वार ! कायरे, काय बातमी ? मायावतीनं–

**स्वारः**—त्यांनीं बार तर उडवला, पण—

**सेनानायकः**—पण ? पण काय ?

**स्वारः**—महाराज नुसती जखम लागून मूर्च्छित झाले आहेत !

**सेनानायकः**—पागल आहेस तूं ! तो खुनशी मायावतीचा--चवताळलेल्या नागिणीचा चावा आहे ! जा तूं. ( स्वार जातो ) शुंभसेन ! बार तर उडाला ! आतां क्षणाचाही विलंब न लावतां रिकामं पडलेलं सिंहासन गांठावयाचं ! सैनिक ! जा ! दुर्गाधिपतीला दुर्ग लढण्याच्या तयारीनं सिद्ध करायला सांगा. म्हणावं, सेनानायक गिरफदार केलेल्या दीनदासाची कालियामहालांत वाट पहात आहेत ! शुंभसेन ! आपण सरदार-मंडळाची खास सभा जयमहालांत बोलवा. आम्ही कालियामहालांत देवी कमलावतीकडं जातों. तिला इकड आणल्यापासून तिच्याकडं लक्ष द्यायला आम्हाला झालंच नाहीं. पण आतां या विजयी उग्रसेनाबरोबर भारतवर्षाच्या पट्टराणीपदाचा मान कोणत्या तरुणीला नकोसा होणार आहे ? शुंभसेन ! पट्टराणीसह आम्ही जयमहलांत येऊं, तों राजपदाची तयारी असूं द्या ! सेनानायकाची तलवार तुमच्या कमरेला लटकायची आहे, हें लक्षांत ठेवा !

[ जातात.

---

## प्रवेश पांचवा.

[ **स्थळः**—विलासदुर्गांतील कालियाबुरजावरचा कालियामहाल. पलीकडे कालियाडोह दिसत आहे. राजभगिनी **कमलादेवी** बसली आहे.]

**कमलाः**—( स्वगत ) छेः ! कांहीं करा, रात्रींच्या मंगल स्वप्नांत गुंगून राहिलेलं मन बाहेर कसं तें निघतच नाहीं ! खरं म्हटलं, तर सेनापती-सारख्या दुष्ट नराधमानं मला इथं आपल्या या कालियामहालांत

उघड उघड पापवासना मनांत धरून आणून ठेवली आहे, तरी-देखील त्याचं कांहींच न वाटतां उलट माझं मन रात्रीच्या स्वप्नांतच गुंगून रहातं ! काय तें मंगल स्वप्न ! पहिला देखावा मात्र जरा कसासाच होता. परवांच्या दरबारचा तो विजयस्तंभ आणि त्याच्या पायामध्यें दडपून भरलेलीं दुबळ्या मानवांचीं पिळवटलेलीं हृदयं-आपलीं मूर्तिमंत दिसलीं ! आणि काय बाई चमत्कार ! चबुतऱ्यावर उभ्या असलेल्या वीरनवालीच्या आक्रोशानं तीं हालूं लागलीं ! एका क्षणाचीच ही चुणूक ! इतक्यांत विजयस्तंभावरचं काळंकुट्ट आकाश प्रकाशानं दुभंगून त्यांत स्वामिजींची प्रसन्नमूर्ति दिसूं लागली ! आणि तिच्या नेत्रांतून टप्टप्टप् आनंदाश्रु गळूं लागले ! त्याबरोबर त्या विजयस्तंभाचे दगडी चिरे पटापट् खालीं कोसळून, आंतून हृदयांचे अंकुर फोंफावून त्यांचाच बनलेला एक नवाच अद्भुत विजयस्तंभ दिसूं लागला ! चबुतऱ्यावरची वीरनवालीची त्रस्त मूर्ति त्या अश्रुधारांनीं सतेज होऊन, विजयस्तंभाच्या कोसळून पडलेल्या एका फत्तराला लत्ताप्रहारांनीं कंदुकाप्रमाणं उडवीत कुणीकडं नाहींशी झाली ! आणि त्या नव्या विजयस्तंभावर त्या अश्रुबिंदूंचीं फुलंच फुलं होऊन, त्या फुलांचा आल्हादकर पण उन्मादरहित, असा परिमल चोहोंकडे दरवळून गेला ! आणि शांततादेवीच्या देवायतनांत पहातें, तों आपली माईचीच मूर्ति ! वर स्वामिजीकडं पाहिलं, आणि साहजिक आपली हातांची ओंजळ पुढं केली; तर त्यांत त्या अश्रुबिंदूंचीं फुलंच नव्हे-तर त्यांचा बाई आपला एक शोभिवंत मुकुटच झाला ! आणि माझ्या कुमारदादानं तो घेऊन आपला माईच्या मस्तकावर ठेवला !

[ सेनापति हातांत मद्याचा चषक घेऊन प्रवेश करतो.]

**सेनानायकः**—देवी ! भारतवर्षाच्या पट्टराणीपदाचा मुकुट तुझ्या मस्तकावर हा भारतवर्षाचा भावी सम्राट् ठेवणार हें आनंदाचं वर्तमान स्वमुखानं तुला कळविण्यासाठीं हा विजयी उग्रसेन यावेळीं आला आहे !

**कमलाः**—(नखशिखांत न्याहाळून) अस्सं ! सेनानायकांचा या राज-भगिनीवरच नव्हे, तर भारतवर्षाच्या राजपदावरही डोळा आहे तर ! (मद्यपात्राकडे पाहून) अभिषेक होऊनच स्वारी आलेली दिसते ! हें अभिषेकाचं—

**सेनानायकः**—होय. हें अभिषेकाचं पवित्रोदक, हें तूं बरोबर ओळखलंस. पण या उग्रसेनाला कलशासारख्या एखाद्या निर्जीव पात्रांतून केलेला अभिषेक कसा रुचावा ? तुझ्यासारख्या तरुणीनं या पवित्रोदकाची चूळ भरून तिनं याला पावन केलंस, तरच तो खरा मूर्धाभिषेक असं या रसिक उग्रसेनाला वाटणार आहे ! तरुणींनीं मद्याचा चूळ टाकून केलेल्या अभिषेकानं बकुलवृक्ष फुलतात. मग तशाच प्रकारच्या तूं केलेल्या अभिषेकानं हा उग्रसेनही राजवैभवानं फुलेल !

**कमलाः**—मग त्यासाठीं हें वेगळं उदक कशाला ? आपल्यासारख्या रसिकाकडं पाहिल्यानं भारतवर्षांतील सगळ्याच तरुणींच्या तोंडाला पाणी सुटून अभिषेकाची अगदीं संततधार होईल !

**सेनानायकः**—समजलों, समजलों. तुला इतर तरुणींचा हेवा वाटतो. हा रसिक उग्रसेन तसा जरी रंगेल असला, तरी कमल, भारतवर्षाचा हा दुसरा दुष्यंतच तुला सांगतो, कीं इतर कैक असल्या, तरी याची शकुंतला तूं ! चल, दुष्यंताप्रमाणं प्रथम आपण गांधर्वविधीनं विवाह लावूं.

**कमलाः**—(स्वगत) हा नराधम आणूं नये तो प्रसंग आणणार ! कमल ! तूं काय करशील ? राजधानीकडून कुणीच कसं अजून येत नाहीं ? माझा कुमारदादा अजून आपल्या झोंपेंतच आहे काय ! द्रौपदीच्या कैवारी भाऊराया कृष्णा ! ही कमल इथं असहाय्यच का ? मग माझं तें मंगलस्वप्न—

**सेनानायकः**—कमल, अशी मुकी कां ? कसले विचार चालले आहेत ? अजूनही तुझ्या मनांत कांहीं शंका ? पण त्या अशा मुक्यानं—आहा ! आतां आलं ध्यानांत ! सेनानायक ! ऐनवेळीं असे अरसिक कसे ठरलांत तुम्ही ? गांधर्वविधि हा आरंभीं मुक्यांचाच विधी आहे ! शाबास कमल ! मनोभाव व्यक्त करण्याची ही चतुराई आजपर्यंत कोणत्याही तरुणीनं या उग्रसेनाला दाखवली नाहीं. याची पट्टराणी व्हायला तूंच योग्य ! चल, हा उग्रसेन तुझ्यावर अगदीं खूष झाला आहे ! मुक्यांनीं प्रारंभ करूनच गांधर्वविवाह—

**कमलाः**—अधमा ! ही कमलादेवी केवळ असहाय्यच आहे असं तुला वाटतं काय ?

**सेनानायकः**—अस्सं ! तर मग तूं सहाय्याची वाट पाहातेस, होय ?

पण लक्षांत ठेव ! माझा हा दुर्ग अभेद्य असून राजधानीपासून दूर–अगदीं सीमान्त प्रदेशाच्या कडेला आहे ! त्याच्या रक्षणासाठीं सारं सरदार-मंडळ आपलं सैन्य घेऊन या ठिकाणीं सिद्ध आहे ! इथं तुला सहाय्य——

**कमला**:—मला सहाय्य ? अभेद्य दुर्गाची घमेंड बाळगणाऱ्या मदोन्मत्ता ! तुझ्या या दुर्गांत माझ्याबरोबरच माझी रक्षणकर्ती–माझी मनोदेवता आली असून, ती मला धीर देऊन सांगते, कीं––

**सेनानायक**:—'मीं मुक्त केलेला माझा दीनदास मला इथं सोडवायला येईल !' असंच ना ? आला आहे ! आला आहे बरं तो ! माझ्या दुर्गाधिपतींनीं पुन्हा गिरफदार करून शृंखलाबद्ध केलेला–तुझ्या तो इतक्यांतच दृष्टीस पडेल !

**कमला**:—हायरे दैवा ! खरं का हें ? पण——

**सेनानायक**:—पण ? हो ! समजत असशील कीं, मी राजभगिनी असून, माझा भाऊ या भारतवर्षाचा सम्राट् आहे ! पण तो तर–( एक दूत लगबगीनें येतो त्यास ) कायरे ! सांगितल्याप्रमाणं त्या दीनदासाला गिरफदार करून आणला आहे ना ? कुठं आहे तो ? अन् दुर्गाधिपति कुठं आहेत ?

**दूत**:—ते स्वतःच गिरफदार होऊन दीनदासांच्या ताब्यांत आहेत !

**सेनानायक**:—पागल ! काय सांगतोस तूं हें ?

**दूत**:—सेनानायक, ही रागावण्याची वेळ नव्हे. आपला जीव बचावा ! दीनदास राजसैन्य घेऊन दुर्गासमोर आले मात्र, दुर्गांतील आपलं सर्व सैन्य 'आम्ही आपल्याच राजाशीं कधींही बेमान होणार नाहीं ! आपल्याच बांधवांवर शस्त्र उगारण्याचं पातक याउप्पर कधींही करणार नाहीं !' असं म्हणत बेलाशक राजसैन्यांत जाऊन सामील झालं ! झालं ! सारा दुर्ग मुकाट्यानं चुटकीसरसा दीनदासांच्या ताब्यांत झाला ! लागलीच जय-महालाला वेढा घालून त्यांनीं दुर्गाधिपतीसह सर्व सरदार-मंडळाला गिरफदार केलं असून, ते आतां आपला आणि ताईसाहेबांचा माग काढीत चोहोंकडे हिंडत आहेत. म्हणून म्हणतों जीव बचावा !

**सेनानायक**:—बरं, जा तूं ! या बुरजाचे सर्व दरवाजे बंद करून चोरवाटेच्या तोंडाशीं येऊन उभा रहा ! ( दूत जातो. ) चल, कमल ! एव-

ध्यानंच हा सेनानायक घाबरून जाऊन हताश होईल असं तूं समजूं नकोस. इथून एक ढेंग टाकली कीं, सामंताच्या राज्यांत मला जातां येईल. सर्व सामंतराजांचीं सिंहासनं या सेनानायकानं स्थिर केलेलीं आहेत. ते सर्व या सेनानायकाचे मिंधे आहेत. त्यांचं सैन्य घेऊन हा सेनानायक भारत-वर्षावर चाल करून येईल. आणि हां हां म्हणतां सर्वांना पादाक्रांत करून नव्या विजयाच्या वैभवानं भारत-वर्षाच्या सिंहासनावर हा बसेल ! चल, कमल ! या पराक्रमी वैभवाची वांटेकरीण होण्यासाठीं तूं याच्याबरोबर या चोरवाटेनं चल ! (हात धरूं लागतो.)

**कमलाः**—चल, हो दूर नीचा ! तुझीं एक एक पापं दांतओंठ खाऊन 'आ' पसरून तुझ्यासमोर आतां येऊं लागलीं आहेत. आंतून त्यांची तुला धडकी भरली असतांना एखाद्या अबलेसमोर बाहेरून हीं पोकळ बढाई कशाला करतोस ?

**सेनानायकः**—तुझा तो प्यारा यार जवळ आला, म्हणून तुला हा दिमाख चढला आहे, होय ? पण असल्या दिमाखाला भीक घालणारा हा सेनानायक नव्हे. पहा ! तुझा हा हात अस्सा धरून ?

**कमलाः**—खबरदार !

**सेनानायकः**—खबरदार ? ( लगट करतो.)

**वीरनवालीः**—(चोरवाटेनें एकदम येऊन ) खबरदार !

**सेनानायकः**—( दचकून मागें पाहून ) खबरदार ? कोण ?

**वीरनवालीः**—महाराजांची तुला काय आज्ञा आहे ? 'तुला थारा ? या ब्रह्मांडकटाहाबाहेरचा तमोमय प्रदेश !' मग तिकडं जायचं टाकून अजून इथच ? चल ! काय, मार्ग सांपडत नाहीं ? कर्मचांडाळा ! प्राणि आपल्या कर्मानंच आपला मार्ग चोखाळून ठेवतो ! तुझा मार्ग ?–कांटेरी तमोमय प्रदेशांत जाण्याचा–कामांधा !-तुझा मार्ग ही वीरनवाली तुला दाखवते. चल ! तो पहा ! तूं तयार करून ठेवलेला–तो कालियाडोह तुझा मार्ग ! चल ! असा स्तंभित कां ? पाण्यांतला मार्ग ? आपखुषीनं बुडून जातां येण्यासारखा नाहीं, होय ? पण मूर्खा ! तुझ्या माथ्यावरचा पापांचा भार पहा ! तोच या वेळीं तुझ्या कामीं येईल ! ऐक ! कत्तलींत पडले-

त्यांच्या किंकाळ्या! 'उग्रसेना! चल! उग्रसेना! चल!' म्हणून तुझ्या नांवानं टाहो फोडीत आहेत!

**सेनानायकः**—(कानांवर हात ठेवून) काय, महाराजांनीं प्रत्यक्ष ऐकवल्या त्यावेळीं ज्या ऐकूं आल्या नाहींत, त्या आतांच कशा शतपटीन ऐकूं येतात?

**वीरनवालीः**—चल! पाय लटपटूं लागले? त्यांना चालन देण्यासाठीं तुझ्या पापांचीच पराणी हातांत घेऊन, ते पहा माझे नाथ!—माझे प्राणप्रिय वीरबाहू! तुझ्या मागं—मानगुटीशीं सज्ज आहेत!

**सेनानायकः**—(मागं पाहून) काय, वीरबाहू? नको! नको! आलों! आलों! (भयानं इकडं तिकडं जाऊं लागतो. वीरनवाली चोरवाटेचा मार्ग बोटानं दाखवीत सारखी 'चल!' म्हणते व तो 'नको! नको! आलों! आलों!' असें म्हणत, तो पुढं व ती मागं असे चोर वाटेनें जातात.)

**दीनदासः**—(प्रवेश करून) कुठं आहे तो नराधम? काय, देवी किसनकुमारी? आपण इथं? आणि राजभगिनी कमलादेवी ताईसाहेब कुठं आहेत? आणि तो दुष्ट नराधम?

**कमलाः**—आतां इतक्यांत याच वाटेनं तो गेला. आपल्याच पापानं गर्भगळीत होऊन वीरनवाली नेईल तिकडं तो चालला आहे!

**दीनदासः**—पण ताईसाहेब कुठं आहेत, तें अगोदर सांगा!

**कमलाः**—त्यांच्याबद्दल आपण निर्धास्त असा. त्या इथंच सुखरूप आहेत. आपण त्या नराधमाची अगोदर वाट लावा!

**दीनदासः**—एका क्षणांत त्याला वाटेला लावून मी ताईसाहेबांच्या सेवेला आलोंच म्हणून त्यांना सांगा. [चोरवाटेनें जातो.

**कमलाः**—(स्वगत) कालच्या स्वप्नांतला फत्तर म्हणजे हा चांडाळ नराधम? (पडद्यांत 'हो! नको! नको! आलों!' व 'चल!' हे आवाज.) मग माझं स्वप्न खरं होणार काय? पण बाई, स्वामिजी आकाशांत दिसले हें काय? पण छेः! मनच वैरी! असलं मंगल स्वप्न न् ही काय भलतीच शंका? पण बाई, आतां कसं करावं? दीनदासजींचा हा भ्रम—छेः! आतां आपल्याच तोंडानं कबुली दिल्याशिवाय कांहीं गत्यंतर नाहीं. (पडद्यांत 'नको! नको! नाहीं! नाहीं! मी नाहीं तिकडं येत!' व 'पळतोस कुठं? चल!' असे आवाज.) काय, फिरून हा नराधम इकडं आला कीं काय?

[इतक्यांत पुढें सेनापति व मागें वीरनवाली असे दुसऱ्याच एका मार्गानें येतात.]

**सेनानायकः**—नाहीं, नाहीं! मी नाहीं तिकडं येणार!—नको! नको! आलों! (कमलादेवीच्या पायांवर पडून) देवी, दया करा! मला वांचवा!

**दीनदासः**—(गेलेल्या चोरवाटेनेंच प्रवेश करून) काय, पुन्हा इकडंच आलास? भला सांपडलास! दुष्टा! चल, घे आपल्या पापाचं प्रायश्चित्त!

[तलवार उगारतो.

**वीरनवालीः**—(मध्यें येऊन) हं, हं भाईजी! आपली पवित्र तलवार या पाप्याच्या रक्तानं विटाळूं नका! वीराचं मरण हा याचा मार्ग नव्हे. याचा मार्ग कालियाडोह! चल! [तो दीनदासाकडे केंविलवाण्या मुद्रेनं पहातो. व 'दीनदासजी! दया करा!' म्हणून करुणा भाकतो.]

**दीनदासः**—चल! ती काय म्हणते तें ऐक! चल! (तो 'नकाहो! नकाहो!—काय सज्जनसिंगा! तूंही?—नाहीं! नाहीं!—जातों—आलों!' व ती सारखी 'चल! चल!' असें म्हणत जातात. मागें दीनदासही जातो.)

**कमलाः**—भारतवर्षाचे विजयी सेनानायक ते हेच का? छेः! इतका दुष्ट, चांडाळ, महापातकी खरा; पण त्याची ही दशा पाहून तिरस्काराचीच कां होईना; पण दया येते. करुणाघन प्रभो! त्याची या अवस्थेंतून आपण सोडवणूक कराल का? (डोळे मिटून हात जोडते. पडद्यांत—दुरून, 'नाहीं नाहीं! नाहीं मी येत! अरे नको!—जातों!—जातों—जातों!' असे शब्द. व त्याबरोबरच पाण्यांत पडल्याचा धप्कन् आवाज) काय वाजलं हें? (पडद्यांत दुरून 'भाईजी! झालं माझं कार्य! आतां या तुमच्या वीरबाहूच्या सतीला—तुमच्या या बहिणीलाही निरोप द्या. छे! छेः! भाऊराया! आतां अडवणं व्यर्थ! माझ्या वीरबाहूच्या बोटांतील हिरकणी पोटांत घेऊनच—' असे शब्द व त्याबरोबरच धप्कन् आवाज.) काय, त्या वीरनवालीचा हा आवाज! मग त्या दुष्टानं अखेरचा दावा साधला किं काय?

**दीनदासः**—(प्रवेश करून) दुष्टाची वाट लागली! पण वीरनवाली—

**कमलाः**—कुठं आहे ती हतदैवी स्त्री? 'या बहिणीलाही निरोप द्या. हिरकणी पोटांत घेऊनच,' असे कायसेसे शब्द कानीं आले, ते तिचेच शब्द—

**दीनदासः**—होय, त्या नखशिखांत हिरकणीचेच ते शब्द! आणि तो

निरोपही त्या वीरबाहूच्या सतीचा अखेरचा निरोप ! तिच्या पतीचा अंत या डोहांतच झाला–तिनंही त्यांतच उडी घेतली ! पण मी कदाचित् पूर्वीप्रमाणंच तिला बाहेर काढीन, म्हणून यावेळीं तिनं अगोदर हिरकणीच गिळली!

**कमलाः**—भारतवर्षाच्या एका हतदैवी स्त्रीच्या अवताराची अशा रीतीनं समाप्ति झाली !

**दीनदासः**—सती आपलं कार्य करून पतीला भेटायला गेली !

**कमलाः**—पापाचं निर्मूलन करण्यासाठीं त्या उभयतांचा हा आत्मयज्ञ ! त्या यज्ञांतून एकरूप होऊन निघालेल्या त्यांच्या आत्म्याच्या दिव्यज्योति भारतवर्षाच्या आकाशांत, पापाला निरंतर भयाचा इषारा देण्यासाठीं अखंड तेवत रहातील !

**दीनदासः**—होय, यांत कांहींच शंका नाहीं. पण देवी किसनकुमारी ! राजभगिनी ताईसाहेब कुठं आहेत ? सम्राटांना त्यांची तिकडं फार काळजी लागली असेल.

**कमलाः**—महाराज ! परिचारिकेच्या रूपानं आजपर्यंत या कमलादेवीनं आपली प्रतारणा केली, त्याबद्दल या राजभगिनीला आपण क्षमा कराल काय ?

**दीनदासः**—काय, देवी ! आपणच राजभगिनी ताईसाहेब ? मग आपणाला परिचारिका लेखून आपणाशीं मर्यादा सोडून जें वर्तन केलं, त्याबद्दल या दासालाच आपण क्षमा केली पाहिजे.

**कमलाः**—छेः, छेः ! महाराज, हं काय ? या कमलादेवीनंच आपली प्रतारणा केली. आणि आपण असं कोणतं वर्तन केलं आहे, कीं तें या राजभगिनीला प्रिय वाटलं नाहीं ?

**दूतः**—( प्रवेश करून ) भाईजी ! महाराज सावध झाले !

**कमलाः**—काय सावध झाले ?

**दूतः**—हो, त्यांची जखम कांहीं—

**कमलाः**—त्यांची जखम ?

**दीनदासः**—काय ? महाराजांना जखम ? [ पडदा.

## अंक चवथा समाप्त.

*

# अंक ५ वा.

## प्रवेश पहिला.

[ स्थळः—विजयस्तंभानजीक राजशिबिराचा आसमंतात् भाग.
खुषमस्कऱ्या व काकाजी येतात.]

**खुषमस्कऱ्याः**—ऐका! ऐका! चंद्रसूर्य तारे हो, ऐका! सर्व मरुद्गण हो, ऐका! सर्व दिक्पालहो ऐका! काकाजी, ऐका!

**काकाजीः**—अरे. काय हे आनंदा, आहे तरी काय? तूं काय महाराजांचा आज दवंडीवाला होऊन ही दवंडी पुकारतोस?

**खुषमस्कऱ्याः**—दवंडी! अन् ती काय म्हणून?

**काकाजीः**—काय म्हणून म्हणजे? महाराजांचा अपमृत्यु टळला; त्यांची जखम चांगली भरून आली; भारतवर्षांतील सर्व पापशक्तींचा बीमोड होऊन त्यांचं बंडही यशस्वी झालं; खऱ्या आनंदमय शांततेच्या महोत्सवाचा सुमुहूर्त आतां निःसंशय सांपडला असून आज इथं विजयस्तंभाजवळ महाराज पुन्हा दरबार भरवणार—याची दवंडी—

**खुषमस्कऱ्याः**—याची दवंडी? याची दवंडी काय म्हणून? चंद्राच्या उदयाची दवंडी सागराच्या जलबिंदूना कधीं कुणीं दिली आहे? 'ऐका! ऐका! जलबिंदूनो ऐका! चंद्रसेनमहाराजांचा उदय होत आहे. तेव्हां त्यांच्या सत्कारासाठीं सर्वजण सिद्ध होऊन सामोरे सरसावा हो!' असा कधीं डांगोरा पिटलेला तुम्हीं ऐकला आहे? काकाजी! प्रेमाच्या भरतीला राजाज्ञा लागत नसते!

**काकाजीः**—तें खरं आहे. पण आतां जो तूं दवंडीसारखा पुकारा करीत आलास, तो काय?

**खुषमस्कऱ्याः**—तो या महाराजांच्या खुषमस्कऱ्याचा सवाल आहे! सवा लाखाचा सवाल! सोडवील त्याला सवा लाख!

**काकाजीः**—मग काय सवाल आहे, तो ऐकूं तर दे.

**खुषमस्कऱ्याः**—अं हं! तो इथं नाहीं. दरबारांत महाराजांच्या साक्षीनं सर्वांसमोर टाकायचा आहे! हं, चला तर लवकर दरबारला. पण थांबा

हां ! आतां काय म्हणालांत तुम्ही इतक्यांत ? महाराजांची जखम चांगली भरून आली ?

काकाजीः—हो, म्हणजे तुला—

खुषमस्कऱ्याः—छेः! या खुषमस्कऱ्याची बातमी याच्या अगदीं उलट आहे!

काकाजीः—काय, उलट ?

खुषमस्कऱ्याः—अगदीं उलट ! निखालस उलट !

काकाजीः—म्हणजे तूं म्हणतोस तरी काय ?

खुषमस्कऱ्याः—काय म्हणजे ? महाराजांची जखम भरून आली नाहीं, इतकंच नव्हे, तर जशीच्या तशी खोल असून आतां तिच्या वेदना अगदीं असह्य झाल्या आहेत !

काकाजीः—हॅः ! भलतंच कांहींतरी ! महाराजांजवळून हा आत्तांच मी आलो. तुझं आपलं कांहींच्या बाहींच ! सारं जग जेव्हां काळजींत, तेव्हां तुला आनंदाच्या उकळ्या फुटतात ! आणि आतां सगळे आनंदांत तर तुझा नूर त्याच्या उलट !

खुषमस्कऱ्याः—काकाजी ! महाराजांच्या या बंडांत आतांपर्यंत त्यांना किती जखमा झाल्या आहेत, याची कांहीं मोजदाद केली आहेत ? संजीवनालयाकडं जातांना घोड्यावरून उडी टाकून बळेंच करून घेतलेली जखम,—ती तेव्हांच बरी झाली,—कबूल ! मिरवणुकीच्या वेळीं मायावतीनं देवी वत्सलामाईवर केलेला वार महाराजांनीं आपल्या खांद्यावर घेतला,—ती जरा जबरच जखम—पण तीही आज तीन वार झाले, चांगली भरून आली,—कबूल ! पण याच्याही पूर्वींची एक काकाजी, जखम आहे !—अगदीं जिव्हारीं भिनलेली,—तिची कांहीं तुम्हांला दखल ?

काकाजीः—हीरे कुठली बुवा पूर्वींची जखम ?

खुषमस्कऱ्याः—कीव येते काकाजी, तुमच्यासारख्यांची ! असे चिरम्या पडलेले बुड्ढ्याच्या बुड्ढेच जन्माला आलांत कांहो ? कधीं तरुणपण ? हृदय म्हणून एक जखमेचा नाजुक भाग ? तिथली जखम ? कधीं ?—असेल तर काय झालं ! पण आतां आठवेल कशाला ? त्या जखमेची गोम !—वळवळते! अजून निघाली नाहीं ! चला दरबारांत बघायला ! [जातात.

---

## प्रवेश दुसरा.

[**स्थळ**:–विजयस्तंभाजवळील दरबार. पुष्पपल्लवादिकांच्या मालांनीं शृंगार-
ल्यामुळें जणुं स्वतःच अंकुरित होऊन फुललेला आहे असा विजयस्तंभ.
**सम्राद्** सिंहासनावर विराजमान होऊन दरबार भरलेला आहे. थेट
**सम्राद्** ते सामान्य प्रजाजन साध्या वेषांत असल्यामुळें विजय-
स्तंभाप्रमाणेंच दरबारही एक प्रकारें फुललेला दिसत आहे.
स्त्रियांचे सज्जांत राजभगिनी **कमलादेवी** यांचे शेजारींच
**देवी वत्सलामाई** दिसत आहेत.]

**कुमारसिंह**:—अमात्य ! आमचा आनंदा कसा अजून आला नाहीं ?

**अमात्य**:—खरंच ! वास्तविक म्हटलं, तर आजचा दरबार हा आनंदाचा दरबार! आणि तोच अजून आला नाहीं !

**खुषमस्कऱ्या**:—( घुंगुरांनीं रुमझुमणाऱ्या दरबारी छडीच्या तालावर खालील गीत म्हणत प्रवेश करून.)

**कडकडाट । घडघडाट । धुम्‌धडाड । धडधडाट ।**
**विजय वांया । स्तंभ काया । कोसळे गड कालियांत ॥ कड०॥**

**अमात्य**:—खुषमस्करेमहाराज ! हा तुमचा प्रवेश कांहीं अपूर्व आहे बुवा ! मागच्या दरबारच्या वेळीं तर शांतिपाठ म्हणत आलांत ! आणि आज ही कडकडाचीन् घडघडाची गडबड काय ?

**खुषमस्कऱ्या**:—अमात्य ! आपण राजकारणांतले दर्यावर्दी आहांत ! आपणाला सांगायला पाहिजे काय, कीं सुरवातीची निर्वात शांति ही भावी भयंकर वादळाची प्रस्तावना ! आणि उचंबळलेल्या सागराची खळबळ ही आनंदाच्या शांतिचंद्राच्या उदयाची सलामी ! कां, खरं कि नाहीं ?

**अमात्य**:—खरं आहे ! अगदीं खरं !

**कुमारसिंह**:—तरीपण आनंदा, हा तुझा कडकडाट न् घडघडाट काय ?

**खुषमस्कऱ्या**:—तो आपल्या राजभगिनी ताईसाहेबांना विचारा ! त्यांना परवां एक कालियामहालांत स्वप्न पडलं, कीं या विजयस्तंभाचे दगडी चिरे धुमधडाड कोसळून पडले ! त्याचा आवाज या दरबारी कानफाट्यानं ऐकला ! तोच हा कडकडाट न घडघडाट !

**कुमारसिंह**:—दरबारी कानफाट्या ? हें रे नांव कुठं पैदा केलंस ?

**खुषमस्कऱ्या**:—आपल्या बंडांत ! त्या बंडांत या आपल्या खुषमस्कऱ्याचे ते दरबारी कान ?–फाटून गेले ! म्हणून आतां हा दरबारी कानफाट्या झाला !

**कुमारसिंह**:—आनंदा ! तुझी कोडेबाजी जरा बाजूला ठेवून आजच्या या मनमोकळया प्रसंगीं आम्ही एक प्रश्न विचारतों, त्याचा सरळ जाब देशील का ?

**खुषमस्कऱ्या**:—कबूल ! पण मग या खुषमस्कऱ्यालाही एक त्याचा सवाल या दरबारला टाकण्याची परवानगी मिळाली पाहिजे !

**कुमारसिंह**:—मिळेल !

**खुषमस्कऱ्या**:—विचारा तर आपला प्रश्न.

**कुमारसिंह**:—तुझ्या तपकिरीच्या डबीचं गूढ काय ? आणि ती तुझी तुला अजून तरी मिळाली का नाहीं ?

**खुषमस्कऱ्या**:—( थांबून गंभीरपणानें ) मिळाली !–पण हरपली !

**कुमारसिंह**:—हें रे काय ? हा जाब म्हणजे निव्वळ शून्यलब्धी !

**खुषमस्कऱ्या**:—महाराज, त्रिखंड धुंडीत असतां या आपल्या खुषमस्कऱ्याला असं आढळून आलं, कीं आमचा कुणाचाही हात पोंचत नव्हता, असं जें भारतवर्षाचं पूर्वीचं उंच-उंच-उंच सिंहासन त्यावर झोंप घेत असलेल्या राजाच्याच कडोसरीला ती तपकिरीची डबी होती ! तिच्यांतली तपकीर–कशी कुणास कळे !–पण त्या राजाच्या नाकांत शिरून तो जागा झाला न् झटकन् कडोसरीला हात घालून त्यानं ती डबी बाहेर काढली ! काढतांक्षणींच डबी हरपली, पण तपकीर मात्र साऱ्या भारतवर्षभर उधळून तिनं राजाप्रमाणं सर्वांनाच जागं केलं !

**अमात्य**:—म्हणजे स्वामिजी गेले, पण त्यांचा सांप्रदाय मात्र साऱ्या भारतवर्षभर पसरून विजयी झाला ! असंच ना ?

**खुषमस्कऱ्या**:—आमचे अमात्य ज्ञानवृद्धच आहेत !

**कुमारसिंह**:—आनंदा ! समजलं तुझं गूढ. या जगाच्या संसाराच्या गूढाप्रमाणंच तें सुखदुःखमिश्रित आहे ! बरं, आतां तुझा सवाल काय आहे तो टाक पाहूं.

**खुषमस्कन्याः**—सुनो सभाजन, सवाल सीधा—

**श्रोते सकल विद्वज्जन। महापंडित विचक्षण।**
**होवोनिया सावधान। सवाल माझा परिसाहो ॥**

ऐका !—

**सोडोनियां उच्चस्थान। घेतलें खालतें उड्डाण।**
**हें नव्हे कीं अधःपतन। सवाल माझा रोकडा हा ॥**

बोला! सोडवील त्याला सवा लाख!

**शुंभसेनः**—अंः! यांत काय आहे ? अहो, उंचीवरून खालीं आलं, कीं अधःपातच !

**खुषमस्कन्याः**—असं ? नीट विचार करून बोला !

**शुंभसेनः**—यांत काय विचार करायचा आहे ? उघड उघड अधःपात!

**खुषमस्कन्याः**—निखालस ?

**शुंभसेनः**—हो, हो ! अगदीं निखालस !

**खुषमस्कन्याः**—तरी म्हटलं शुंभसेन! महाराज! आपली कांहीं अडगत नाहीं !

**कुमारसिंहः**—कांरे बुवा ?

**खुषमस्कन्याः**—अधःपात! आपला उघड उघड, अगदीं निखालस अधःपात! मी नव्हे, हे शुंभसेन म्हणतात !

**कुमारसिंहः**—तो रे कसा ?

**खुषमस्कन्याः**—अगदीं गंगेप्रमाणं ! अहो, हे शुंभसेनच काय, भर्तृहरी-देखील गंगावतरणाला अधःपातच म्हणतो. 'अधोऽधो गंगेयम् पदमुपगतां' अरेरे! या गंगेनं आपलं उच्चस्थान सोडल ! अधःपात! अधःपात! महा-राजांनीं देखील आपलं उंच-उंच-उंच सिंहासन सोडलं! राजेपण टाकून देऊन खालीं प्रजेंत आले! पहा, महाराजांत आणि प्रजेंत कांहीं भेद ? शुंभसेन ! अधःपात! महाराजांचा अधःपात !

**अमात्यः**—शुंभसेन ! अधःपात हा जडदेहाच्या नव्हे, तर मनाच्या स्थानावरून ठरत असतो. गंगा खालीं आली, पण तिनं सगरांचा उद्धार केला! तिचं आज जें माहात्म्य आहे, तें ती विष्णुपदींच राहिली असती

तर झालं असतं काय ? कोणताही अवतार हा वाच्यार्थानं अधःपातच आहे. पण वस्तुतः अवतार म्हणजे विष्णुपदींच्याच नव्हे, तर विष्णु-हृदयींच्या गंगेचं अवतरण होय! महाराज आपलं उंच सिंहासन सोडून खालीं आले, त्यामुळं त्यांच्या जडदेहाचं राजकीय वैभव आकुंचित झालेलं —अगदीं लहानाळलेलं दिसेल; पण त्यांच्या मनांतील वत्सलतेचं- साऱ्या भारतवर्षाचं मंगल करणारं वैभव भारतवर्षाइतकंच विशाळलेलं दिसत नाहीं काय? शुंभसेन! महाराजांच्या या अवताराचा हा चमत्कार खरो-खरच लोकोत्तर आहे. आपणांसारख्या तरुणांना तर काय, पण ज्यानं भारतवर्षाच्या पुऱ्या तीन पिढ्या आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या आहेत, अर्धशतकपर्यंत राज्यधुरा चालवून बुद्धिवैभवाचा आणि मुत्सद्देगिरीचा डौल मिरवला आहे, त्या या वृद्धालाही या अवतारानं चकित करून सोडलं आहे. भारतवर्षांत पुण्यशक्ति निर्माण होऊन तिचंच साम्राज्य अखंड रहावं, हीच वस्तुतः या भारतवर्षाच्या अमात्याची अर्धशतकाची धडपड. पण राष्ट्रांतील शरीरबल—ज्याला राजकारणांत क्षात्रतेज असं मोठ्या गौरवानं म्हटलं जातं,—तें बल एकवटून त्याला केवळ बुद्धिकौशल्यानं खेळवीत राहिलं, तर ती पुण्यशक्ति निर्माण होईल, अशी या वृद्धाची वेडी आशा. याच आशेनं तो आजवर धडपड करीत आला. पण ती आशा वेडी इतकच नव्हे, तर परिणामीं घातकच होय, हें काळानं या अंधावलेल्या प्रज्ञाचक्षूच्या प्रत्ययास आणून दिलं! केवळ बुद्धिकौशल्यानं एकवटलेलं शरीरबल ही पुण्यशक्ति न होतां परिणामीं केवळ पाशवी—आसुरी शक्तीच होते. खरी पुण्यशक्ति ही राजाच्या अंतःकरणांतील वत्सलता आणि तिच्यामुळं उचंबळलेला प्रजेच्या प्रेमाचा सागर यांतच आहे. या पुण्यशक्तीचा प्रभाव शुभसेन, कसा आणि केवढा आहे, हे महाराजांच्या वडानं घडवून आणलेल्या विलक्षण क्रांतीनंच दिसून येणारं आहे. सरदार-मंडळांत एकवटलेलं भारत-वर्षाचं पाशवी क्षात्रबल केवढं प्रचंड होतं! निराशेच्या रात्रीप्रमाणं सर्वत्र पसरलेल्या त्याच्या मेसूर छायेला कुठं अंतच नाहीं, असं भारतवर्षाला वाटूं लागलं होतं. लुकलुकणाऱ्या असंख्यात तारका जिवाची धडपड करीत असतांही त्या छायेचं पटल रेसभरही सरकलं नाहीं. पण महाराजांच्या अंतःकरणांत वत्सलतेचा प्रकाश पडतांच, त्यानं प्रकाशित होऊन महा-

राजांचा सूर्य जेव्हां पूर्वक्षितिजावर उदय पावला, तेव्हां तीच भेसूर छाया हां हां म्हणतां पार कोणीकडच्या कोणीकडे वितळून गेली ! एका क्षणाच्या पक्षघातानं हतबल होऊन महाराजांच्या प्रभावाला विरोध करण्याचं तिला सामर्थ्यच राहिलं नाहीं. अहिरावणाची चंद्रसेना मूळची साध्वी, पण तिच्या मनांत पाप शिरून ती जेव्हां पाशवी बनली, तेव्हां तिचा अभेद्य आणि अभंग वाटणारा भोगमंचक तिच्या पापाच्या भुंग्यानंच पोंखरून हतबल केलेला असल्यामुळं रामचंद्राच्या केवळ पादस्पर्शानं तो भंगून गेला ! शुंभसेन ! महाराजांच्या या लोकोत्तर अवताराचं, त्यांच्या बंडाचं आणि त्या बंडानं घडवून आणलेल्या शांतस्वरूपी क्रांतीचं रहस्य हें अशा प्रकारचं आहे. एकीकडून मदांध झालेल्या पाशवी शक्तीच्या पापाचा भुंगा त्या शक्तीला पोंखरून या क्रांतीची पूर्वतयारी करीत होता; तर दुसरीकडून ब्रह्मीभूत स्वामी विश्वानंदजी यांचा सांप्रदाय वत्सलतेच्या जागृतीनं महाराजांच्या सूर्याचा प्रभाव जाणवीत होता. अशाप्रकारें घडून आलेल्या क्रांतीमुळं, खुपमस्करेमहाराजांनीं आतांच म्हटल्याप्रमाणं, खऱ्या खऱ्या आनंदाच्या शांतिचंद्राचा उदय आतां निःसशय झालेला आहे. त्या उदयामुळं विकसित झालेल्या शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा जर कोठें व्हायची असेल, तर ती एखाद्या दगडी देवायतनांत नसून, भारतवर्षाइतकंच विशाळलेलं जें महाराजांचं हृदय त्या हृदयांत—माझे भारतवासी बांधवहो ! या वृद्धाची ही अखेरची तळमळ !—आपणां सर्वांचीही तीच आहे, असं जाणून—तो आपली ही अखेरची तळमळ—इथं बोलून दाखवीत आहे, कीं आतां शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा महाराजांच्या हृदयांत अखिलभारतमंगलकारिणी अशा पट्टराज्ञीच्या रूपानंच व्हावयास पाहिजे.

**मोतीरामः**—बस्, बस्, बस्, बस् ! अमात्यांनीं आम्हां सर्व भारतवासियांचीच तळमळ या वेळीं बोलून दाखविली ! भाईहो ! कां, मी म्हणतों तें खरं कि नाहीं ?

**सर्वः**—खरं, अगदीं खरं ! हीच आमची तळमळ !

**मोतीरामः**—महाराज, या मोत्याला आपण एके प्रसंगीं एक वचन दिलेलं आहे.

**कुमारसिंहः**—मोतीराम, तुम्ही तें सांगण्यापूर्वींच आम्हीं तें पुरं केलं आहे, असं समजा आणि बोला काय तें.

**मोतीरामः**—बस्स्! या मोत्याच्या जन्माचं सार्थक झालं! 'मी राजा असतो, तर तुमची मुस्कटदाबी कायमची काढून टाकली असती!' हेच आपले शब्द ना? मोत्याची मुस्कटदाबी निघाली! त्याच्या जन्माचं सार्थक झालं! आतां तोंड उघडल्यामुळं दिल् खुला करून बोलतों. भाई हो! शांततादेवीची प्राणप्रतिष्ठा महाराजांच्या हृदयांत अखिल भारतमंगलकारिणी अशा पट्टराणीच्या रूपानं व्हावयास पाहिजे, असा अमात्यांनीं आपला मनोदय आतांच सांगितला. मग स्वामिजींनीं ब्रह्मीभूत होतांना 'अखिल भारतमंगलकारिणी हो' असा आशीर्वाद कोणाला दिलेला आहे?

**सर्वः**—माईना! माईजींना! माईजींना!

**वत्सलामाईः**—( मोतीरामजवळ एकदम येऊन ) मोती! मोती! काय हें! तोंडाची मोकळीक म्हणजे स्वैरपणाच काय? भलभलतं बोलणारी ती रसवंतीच नव्हे! बाप्पाजींच्या वाणीला असा मतलबीपणा लावतोस?

**मोतीरामः**—त्यांच्या वाणीला मतलबीपणा लावायला हा मोत्या काय एखाद्या ढोंगी गुरूचा चेला आहे? बाप्पाजींची वाणी लौकिकी साधूप्रमाणं मतलबाच्या मागं जाणारी नसून मतलबच तिच्या चरणाशीं लोटांगण घालीत येत असतो!

**कमलाः**—( वत्सलामाईजवळ येऊन ) माई! बाप्पाजींचा आशीर्वाद अशा रीतीनं खरा झाला, तर या तुझ्या कमलला किती आनंद होईल म्हणून सांगूं! हिला पडलेलं स्वप्न—

**अमात्यः**—तें स्वप्न खरं झाल्यानं या वृद्ध अमात्याला तर परमावधींचा संतोष होणार आहे. महाराजांनींच आपला मनोदय आतां—

**कुमारसिंहः**—अमात्य, आपणां सर्व आबालवृद्धांच्या प्रेमाचं प्रोत्साहन मिळालं, आणि त्यामुळं राजा म्हणून या सम्राटाचा माथा उजळ झालेला असला, तरी या तिरस्करणीय कुमाराची नालायकी—

**वत्सलामाईः**—महाराज! महाराज! या अजाण अबलेनं एका विपरीत प्रसंगीं विकाराच्या आधीन होऊन काढलेले शब्द मनांत ठेवून हिच्यासंबंधानं भलता समज करून घेऊं नका!

**खुपमस्कऱ्याः**—अरे, या खुपमस्कऱ्याला कुणीच विचारीत नाहीं ? कारण आतां कानफाट्या हा ! पण हा कानफाट्याच आपल्या कोऱ्याचा कान पिळून सुराला सुर मिळवून देईल ! कानपिळणीची टोपी मात्र याला मिळाली पाहिजे !

**कमलाः**—मिळेल, मिळेल बरं आनंदा, माईचा दुधभाऊच तूं !– तुलां कानपिळणीची टोपी मिळालीच पाहिजे. कान पिळायला मात्र तयार हो, म्हणजे झालं !

**खुपमस्कऱ्याः**—अरे बापरे ! महामंडलेश्वरांचा–? कांहीं झालं, तरी खुपमस्कऱ्या आहे मी ! महाराज ! जरा–कान करतां का इकडं ? म्हणजे पिळीत नाहीं हो !

**कुमारसिंहः**—आनंदा ! अशा वेळींदेखील तुला—

**खुपमस्कऱ्याः**—धीरे ! जरा धीरे ! इथं एक गोम नडते, ती आहे आपल्या कानांत. ती तेवढी काढायची आहे ! आपल्या म्हणे विशाळ राजरूपाला सगळ्या प्रजेच्या हृदयांत स्थान मिळालेलं आहे. का माई, आहेना ? पहा ! माईनादेखील कबूल ! पण माई ! सुकुमार कुमाररूपाला जे एक स्थान–आपलं आपलं एकच एक !–तें–काकाजी ! वळवळणारी गोम ! का महाराज, हीच ना ?

**कमलाः**—हीच रे हीच ! आनंदा, हीच बरं गोम ! मग काढतोस का ?

**खुपमस्कऱ्याः**—छेः बुवा ! पण आपल्याप्रमाणंच परवां एक स्वप्न पाहिल्यासारखं वाटतं. तें तेवढं महाराजांच्या कानांत हळूच सांगतों पाहिजे तर. मात्र तें झोंपेंतलं का जागेपणचं, त्याची हमी आपण घेत नाहीं !

**कमलाः**—पण काय तें सांगशील तर खरं.

**खुपमस्कऱ्याः**—मिरवणुकींतल्या जखमेनं महाराज घायाळ झाले होते; तेव्हां एक रात्र जरा आणीबाणीचीच होती; त्या रात्रीचं स्वप्न ! महाराज, ऐकतांना? म्हटलं हें राजगुह्य आपल्या –आणि आपल्या एकट्याच्याच कानांत सांगायचं आहे ! दुसऱ्या कुणीं ऐकायचं नाहीं हां ! आपण ज्वराच्या भरांत तळमळत पडलां आहांत, एक माणूस वांकून आपलं ध्यान करीत आहे, दृश्य पाहिलं न् गुंगलोंच मी ! आणि काय चमत्कार ! डोळ्यांतली गंगा–

जान्हवी तोय !–औषधच तें ! तळमळ शांत ! ओंठावर हास्य ! वरचे ओंठ, खालचे ओंठ–काय झालं हरि जाणे !

**वत्सलामाईः**—( आनंदाचें तोंड आपल्या हातांनीं बंद करून ) आनंदा ! आतां—

**खुषमस्कऱ्याः**—हें हो काय माई ? मला स्वप्न सांगूं द्याना ?

**वत्सलामाईः**—हें रे काय आनंदा ? बघ हां—

**कुमारसिंहः**—(सिंहासनावरून एकदम आनंदाजवळ येऊन) आनंदा, खरं का हें ?

**खुषमस्कऱ्याः**—गोम निघालीरे निघाली ! काकाजी ! जखम आतां भरून आली ! हं भाईजी ! बसलांत काय ? या पुढं, आणि म्हणा आतां 'हा भगिनीचा कर मी—'

**दीनदासः**—महाराज ! माझा अधिकार नाहीं. पण आपलं हृद्गत, अमात्यांचा मनोदय आणि माझ्या ताईचं प्रेम हें जाणून बाप्पाजींचा आशीर्वाद पुरा करण्यासाठीं मी माझ्या ताईचा हात आपल्या हातांत देत आहें. ही केवळ प्रजेची निष्ठा आपल्या चरणीं मी प्रजेच्या वतीनं सादर करीत आहें. असं मानून आपण तिचा स्वीकार करावा, अशी आपल्या चरणाशीं प्रार्थना आहे.

**खुषमस्कऱ्याः**—बोला ! शुभमंगल सावधान !

**कमलाः**—महाराज ! या शुभमंगलाची केळवण या आपल्या बहिणीनं अगोदरच केलेली आहे, हें लक्षांत असूं द्या !

**खुषमस्कऱ्याः**—हो ! ( 'रायाचं लगीन ! भइनीची केलवन' इ० चकव्याचे चरण म्हणतो.)

**कुमारसिंहः**—ताई ! आनंदा ! दीनदासजी ! स्वामिजींच्या आशीर्वादाला, प्रजेच्या प्रेमाला अशाप्रकारें पात्र होऊन देवींच्या हृदयांत या कुमारसिंहाला स्थान मिळालं, त्यायोगानं याला आज केवढी धन्यता वाटत आहे ! अमात्य ! हें स्थान न मिळतं, तर हें भारतवर्षाचं वैभवशाली सिंहासन त्याला अखेरपर्यंत केवळ कांटेरीच झालं असतं. प्रजेनं आपली निष्ठा आज आम्हांला या रूपानं दिली. देवी ! प्रजेलाही तशीच देणगी आम्हीं या प्रसंगीं दिली पाहिजे, नाहीं ? आमचे प्रजाजनहो ! आपले

पुढारी जे भाई दीनदासजी यांचे हातांत या आमच्या प्रिय भगिनी कमला-देवी यांचा हात आम्ही मोठ्या प्रेमानं देत आहों. ताई! आपली केळवण आम्ही विसरलों नाहीं बरं! त्यावेळीं पाहुणचारानं प्रसन्न झालेल्या या कुमारानं काय आशीर्वाद दिला आहे ? हं, हं ! आतां लाजायचं कारण नाहीं. कोणाच्या हातानं आपल्या हृदयाची सारंगी कंपित होते, तें आम्हीं पूर्वींच ओळखलं आहे ! देवी, घ्या पाहूं आपल्या लाजऱ्या मैत्रिणीचा तो हात इकडं. आम्ही दीनदासजींचा घेतों. ( तसें करून एकमेकांच्या हातांत हात घालतात.)

**खुषमस्कऱ्याः**—बोला ! शुभमंगल सावधान !

**कुमारसिंहः**—लक्षांत घ्या, भारतवर्षाच्या दरबारांत आमच्या ताई-साहेब सेनापतीणबाई व्हायचं घाटत होतं ! म्हणून भाई दीनदासजी यांना याच वेळीं आम्ही भारतवर्षाचं सेनापतिपद अर्पण करतों !

**मोतीरामः**—बोला ! सेनापति दीनदासजी यांचा जयजयकार असो !

**कुमारसिंहः**—मात्र भारतवर्ष हा कृषिवलांचा देश आहे. तेव्हां भारत-वर्षाचे सेनापति हे कृषिवलांच्या सेनेचे अधिपति होत. कृषिवल हे कोण-त्याही समाजाचे शेष ! या भूमीचा सारा भार शेषाच्या मस्तकावरच आहे ! बलरूपानं अवतरलेला बलराम हा शेषाचाच अवतार ! त्या बलरामाच्या हातांत कोणतीं शस्त्रं होतीं ? हंसूं नका ! नांगर आणि मुसळ हींच तीं शस्त्रं ना ? मग आमच्या सेनापतींनीं आणि सैनिकांनीं याच शस्त्रांनीं नेहमीं उद्यतदंड असावं, असं होत नाहीं काय ? वेळ पडली, तर बलरामा-प्रमाणं याच शस्त्रांनीं आम्हांला शत्रुसंहार करतां येईल, अशी दृढश्रद्धा निदान आम्हीं भारतवासियांनीं धरलीच पाहिजे ! ताई ! एका राजकन्येला नांगऱ्याच्या हातीं देऊन आम्हीं तिला दळण-कांडण करायला लावली, याबद्दल आमचे पूर्वज कांहीं नव्हेत–पण आजकालचे लोक मात्र आमची छीः थूः करतील, नाहीं ?

**खुषमस्कऱ्याः**—छीः थूः ? बोला ! राजकन्या किसानदेवी यांचा जयजयकार असो !

**कुमारसिंहः**—किसानदेवी का किसनकुमारी ?

**खुषमस्कऱ्याः**—अंहं ! किसानदेवी ! किसान म्हणजे शेतकरी !

**काकाजीः**—आनंदा ! या म्हाताऱ्याच्या डोळ्याचं पारणं फिटलं ! इतके दिवस तुझी ती गंगा—तिचे वळसे—कड्यावरच्या तिच्या उड्या—यानं हा म्हातारा जीव अगदीं बावरून गेला होता. आज मात्र या पारणं फिटलेल्या डोळ्यांनीं तुझा आनंदाचा रामप्रहर उजाडलेला पाहिला !

**शुंभसेनः**—अहो खुषमस्करेमहाराज ! हें तुमचं सगळ्यांचं झालं, पण आमची काय वाट ? आम्हीं मघाशीं सवाल सोडवला त्याचं बक्षीस ?

**खुषमस्कऱ्याः**—हो खरंच ! हें घ्या ! [ मूठ दाखवतो.

**शुंभसेनः**—हें हो काय ? सवा लाख पाहिजेत !

**खुषमस्कऱ्याः**—मग हेच सवालाख ! झांकली मूठ सवा-लाखाची ! वर आणखी ही आमची दरबारी कानटोपी घ्या ! सरदार-मंडळाचे आपण शेष ! त्या शेषानंच आतां या पूर्वींच्या दरबारी कानटोपीचा भार आपल्या मस्तकावर वहावा ! आम्हाला आतां कानपिळणीची नवी टोपी मिळायची आहे ! का माई ! खरं ना ?

॥ श्रीरामकृष्णार्पणमस्तु ॥

समाप्त